# प्रेम आणि विद्वत्ता

व

## इतर कथा

लेखक,

गंगाधर देवराव खानोलकर

कापडी प्रत १ रु. ] प्रतिभा-प्रकाशन मण्डळ [ कागदी प्रत १२ आणे

# प्रतिभा-प्रकाशन मण्डळ

स्वस्त पण उच्च दर्जाचें ललित व तद्विषयक चर्चात्मक वाङ्मय प्रसिद्ध करणें हा या मण्डळाचा मुख्य उद्देश आहे. मण्डळाच्या कोणत्याहि पुस्तकाची किंमत दीड रुपयाहून अधिक ठेविली जाणार नाहीं.

'**प्रेम आणि विद्वत्ता**' हें पुस्तक विकत घेऊन सोबतचें कार्ड भरून पाठविणाऱ्यास मण्डळाचा **कायम सभासद** समजण्यांत येईल व त्यास मण्डळातर्फें प्रसिद्ध होणारीं पुढील सर्व पुस्तकें पाऊणपट किंमतीस देण्यांत येईल.

मण्डळासाठीं सुप्रसिद्ध कथालेखक श्री. विष्णु सखाराम खांडेकर यांनीं '**उद्धार**' नांवाची एक औपरोधिक सामाजिक कादंबरी लिहावयास घेतली असून, ती लवकरच प्रसिद्ध करण्यांत येईल.

मण्डळाचा पुढीलप्रमाणें लेखकवर्ग आहे:—श्री. वि. स. खांडेकर; श्री. ग. त्र्यं. माडखोलकर; श्री. गिरीश; श्री. यशवंत, प्रो. माधवराव पटवर्धन, एम्. ए; प्रो. श्री. बा. रानडे, एम्. एस् सी; प्रो. ज. नि. कर्वे एम्. एस् सी; श्री. के. ना. काळे, बी. ए. एल् एल्. बी; श्री. वि. ह. कुळकर्णी, एम्. ए; श्री. खं. सा. दौंडकर, एम्. ए. एल् एल्. बी; श्री. श्री. के. क्षीरसागर, बी. ए.

मण्डळातर्फें डिसेंबरच्या पहिल्या आठवड्यापासून एक वाङ्मयविषयक '**प्रतिभा**' नांवाचें पाक्षिक सुरू करण्यांत येईल. "महाराष्ट्रांतील व महाराष्ट्राचे बाहेरील वाङ्मयविषयक चळवळींची माहिती गोळा करून प्रसिद्ध करणें; प्रत्येक पंधरवड्यांत प्रसिद्ध होणाऱ्या वाङ्मयाची चर्चा करणें; ग्रंथलेखन, ग्रंथप्रकाशन व ग्रंथमुद्रण यांसंबंधींचे विचार प्रसिद्ध करणें व मराठी वाङ्मयाच्या एकंदर प्रगतीस सहाय्यक होईल असा मतप्रचार करणें," हें या पाक्षिकाचें ध्येय आहे. पाक्षिकाचें स्वरूप व धोरण इंग्रजींतील 'जॉन ओ लंडन्स् वुइकली, 'बुकमन,' 'मरक्युरी' यांसारखें राहील.

**प्रतिभेच्या प्रत्येक अंकाची किंमत अर्धा आणा असून वार्षिक वर्गणी टपालहंशीलसह एक रुपया ठेविली आहे.**

# कथालेखकाचें कथन



माझ्या भोंवतालच्या जगांत जीं दृश्यें मला दिसलीं, तीं कथारूपानें आपणापुढें ठेविलीं आहेत. या संग्रहांतील दहा कथांपैकीं आठ कथा प्रेम आणि वैवाहिक जीवन या संबंधींच्या आहेत. त्यांपैकीं प्रत्येक कथा विशिष्ट प्रसंग, व्यक्ती किंवा विचारसरणी पाहून ज्यावेळीं हृदय खळबळलें व मन विचारचक्रांत सांपडलें त्याचवेळीं लिहिली गेली आहे. 'शोफरचा शेट' व 'पण पर्वा कुणाला ?' या दोन कथा एका वृत्तपत्राचे कचेरींत नोकरीला असतां त्या पत्राचे रकाने भरून काढण्याकरितां लिहिल्या; पोटांतील काव-काव थांबविण्याकरितां लिहिल्या; त्यांत मन घातलें नाहीं, हृदय ओतलें नाहीं. मला स्वतःला या दोन्ही कथा निःसत्त्व व चैतन्यहीन वाटतात. पुस्तकाची जाडी वाढावी एवढ्याच हेतूनें मी त्या यांत दिल्या आहेत.

अलिकडे, मराठी लघुकथेची, तंत्र व कला या दृष्टीनें प्रशंसनीय अशी प्रगति झाली आहे. श्री. सरस्वतिकुमार, श्री. दिवाकर कृष्ण, कॅप्टन लिमये, श्री. खांडेकर, श्री. के. का. जोशी, श्री. य. गो. जोशी, श्री. वाग्भट देशपांडे, श्री. वि. स. सुखठणकर, 'कृष्णाबाई,' सौ. आनंदीबाई शिर्के वगैरेंच्या लेखणींतून उच्च दर्जाच्या कथा बाहेर पडत आहेत. तंत्राबरोबरच विचार, कल्पना व भावना यांचें सुंदर मिश्रण यांच्या कथांत आढळतें. या लेखनचतुरांनीं आपल्या वाङ्मय-गुणांनीं भूषविलेल्या या क्षेत्रांत माझ्यासारख्यानें पाऊल टाकणें, हें खरोखरीच धाष्टर्य आहे. पण प्रसिद्धीची हांव कुणाला सुटली आहे ? आणि प्रसिद्धी मिळाली नाहीं, तरी स्वतःच स्वतःला 'कथालेखक' म्हणून ऐट तर मिरवितां येईल ?

१ डिसेंबर १९३२<br>
प्रतिभा-प्रकाशन मण्डळ,<br>
गिरगांव, मुंबई (४)

गंगाधर देवराव खानोलकर

माझे दोघे जिव्हाळयाचे स्नेही

प्रो. भालचंद्र पुंडलिक आडारकर, बी.ए.( केंब्रीज )

व

प्रो. माधवराव त्र्यंबक पटवर्धन, एम्. ए.

यांस

# अर्पण

# कथांचा अनुक्रम



# खानोलकर यांचें वाङ्मय

## प्रकाशित

(१) श्रीपाद कृष्ण कोल्हटकर (चरित्र) ०—८—०

(२) प्रो. विष्णु गोविंद विजापूरकर (चरित्र) १—०—०

(३) लाला लजपतराय

[यांतील आत्मचरित्राचा भाग श्री. 'राम' यानीं अनुवादित केला असून चरित्राचा भाग रा. खानोलकर यांनीं स्वतंत्रपणें लिहिला आहे.] २—८—०

(४) अर्वाचीन मराठी वाङ्मयसेवक

प्रथम खण्ड २—८—०

(५) प्रेम आणि विद्वत्ता व इतर कथा (कागदी) ०—१२—०

(कापडी) १—०—०

## अप्रकाशित

(१) अर्वाचीन मराठी वाङ्मयसेवक

द्वितीय व तृतीय खण्ड

(२) मराठी कादंबरी व कादंबरीकार

(३) प्राचीन मराठी वाङ्मयसेवक

(४) मराठी विनोदी, औपरोधिक व विडंबनात्मक कविता

(५) नवशक्ति (कादंबरी)

# प्रेम आणि विद्वत्ता

रजनीनें आपले सांवळे पंख पसरावयाला सुरवात केली होती. नारळींच्या बागेंतून वायु गूढ गुंजन करीत स्वैरपणें विहरत होता. सबंध दिवसाच्या श्रमानें श्रांत झालेले पौरजन पुळणीवर स्वस्थपणें विसांवा घेत पडले होते. सागराचें संध्यासंगीत सुरू झालें होतें.

‘ कळलं बरं. कळलं तुझं संगीत. आमच्या संगीतापुढें तुझ्या संगीताचा दिमाख कशाला ! ’ काळ्या पडद्यांबाहेर हळुच डोकावणाऱ्या तारका डोळे मिचकावीत विचारूं लागल्या.

‘ माझं ग कसलं संगीत ! तुमच्यासारखी तारुण्यांतील नवनवलाई माझ्यामध्यें थोडीच आहे ! तुम्हीं पिंगा घालूं लागलांत कीं त्याला ताल धरायचा, एवढंच माझं काम. खरं ना हें ? अशा लाजतां कां ? मघां कुठं गेली होती ती लज्जा ? कां आतां हा चंद्र आला म्हणून ? रोहिणी, मी म्हणतों तें खरं ना ? ’ सागराच्या प्रश्नाला रोहिणीनें उत्तर दिलें नाहीं. आपल्या सन्निध असलेल्या प्रियकराकडे एक लज्जापूर्ण कटाक्ष फेंकीत ती गालांतल्या गालांत फक्त हंसली. सागरदादा गंभीर झाले. त्यानीं पुनश्च आपलें संगीत सुरू केलं. तारका पिंगा घालूं लागल्या. सारें विश्व गीतध्वनीनें निनादून गेलें.

“ माझं जीवनहि असंच संगीतमय होईल का ?” तळहातावर डोकें टेंकून ही सारी मौज पहात असलेल्या लतिकेच्या डोक्यांत अस्पष्ट असा एक विचार येऊन गेला. “स्त्रियांचं जिणं परस्वाधीन आहे असं म्हणतात. अमक्या ठिकाणीं बैस म्हटल्यावर बसलं पाहिजे, उठ म्हटल्यावर उठलं पाहिजे; अमकं कर

म्हटल्यावर केलं पाहिजे; अमकं करूं नको म्हटल्यावर करतां नये. सर्कशींतील जनावरं आणि आम्हीं परिस्थितीनं सारखींच ! आम्हांला स्वतंत्र अस्तित्वच नाहीं. एकेकदां वाटतं कीं, आपण या फंदांत पडूंच नये. बाबांना एकदां सांगून टाकावं कीं, मला आपलं असंच राहायचं आहे म्हणून. हृदयाशीं इतके दिवसपर्यंत घट्ट कवटाळून धरलेलीं तत्वं कायमचीं सोडून देणं मला शक्य आहे का ? माझीं सुखस्वप्नें खरीं ठरणार नसतील तर मला तें तशा तऱ्हेचं आयुष्यच नको आहे. माझ्याशीं समरस होऊन परस्परांचें जीवन सुखमय करणारं माणूस मला हवं आहे. ते तसे समरस होतील का ? ते मोठे विद्वान आहेत म्हणतात. विलायतेचा त्यांनीं दोनदां प्रवास केला. एक जाडा भाषाशास्त्रज्ञ म्हणून त्यांचं नांव गाजत आहे. त्या दिवशीं त्यांना पाहातांच माझ्या मनांत त्यांच्याबद्दल आदर उत्पन्न झाला, पण प्रेम कांहीं उत्पन्न झालं नाहीं. किती विनयपूर्ण बरं ती मुद्रा ! विद्वत्तेचा गर्व कसला तो नाहीं. अशाशीं माझा जन्माचा संबंध जुळून येत आहे ही किती बरं भाग्याची गोष्ट ! हो, पण ही विद्वत्ता माझं जिवन सुखमय करायला मदत करील का ? त्यांच्या आवडीनिवडी आणि माझ्या आवडीनिवडी, त्यांचे विचार आणि माझे विचार, त्यांचा समाज आणि माझा समाज हीं जर भिन्न असलीं तर ! दोन टोकं एकत्र कशीं मिळावीं ! ”

तिच्या डोक्यांत विचारांची परंपरा सुरू झाली होती. तिचें चित्त अस्थिर झालें होतें. पुळणीवरून भिरभिर वाहणाऱ्या वाऱ्यावर तिनें एक दीर्घ निःश्वास सोडला आणि अमर्याद पसरलेल्या सागराकडे ती निश्चल दृष्टीनें पाहूं लागली. जणूं काय ती सागराला विचारीत होती, ‘ आजोबा, तुम्हांला सारेजण रत्नाकर म्हणतात ना ? मग माझ्या हृदयाच्या कोंदणांत बसूं इच्छिणाऱ्या या रत्नाची पारख तुम्हांला नाहीं का करतां येणार ? हें रत्न माझ्या जिवाचं रत्न होईल का ? आपल्या तेजोमय किरणांनीं माझं हृदय कायमचं प्रकाशित उल्हसित करील काय ? का......? ’

“ लता, किती वेळपर्यंत बसणार आहेस तूं इथं ? चलायचं नाहीं का घरीं ? लता, लता—”

# प्रेम आणि विद्वत्ता

ती आपल्या तंद्रींतच होती. बाह्य सृष्टीचें भान तिला राहिलें नव्हतें. तिच्या दादाच्या हांका तिला कांहीं क्षण ऐकूंच आल्या नाहींत.

" लता, लता ! " तो तिला हालवीत म्हणाला, " चलायचं नाहीं का घरीं ? "

" काय म्हणालास ? " अर्धवट तंद्रींतच तिनें विचारलें.

" अंधार पडला. घरीं जाऊं आतां. "

" हो, खरंच किती उशीर झाला हा ! "

तिनें आपल्या लुगड्यावरची रेती नीट झाडली, वाऱ्याच्या झुळकांबरोबर भुरभुर उडणाऱ्या आपल्या केंसांवरून चापचोपून हात फिरविला, व ' हं चल, ' असें म्हणून ती त्याच्याबरोबर चालूं लागली.

" लता, कसला ग एवढा विचार चालला होता तुझा ? " दादानें विचारलें.

" माझा ! छे ! मी आपली गमतीनं समुद्राकडे पहात होतें. "

" लबाड कुठली. समुद्राकडे पहात होतीस काय ? मला कांहीं समजलं नाहीं म्हणून समजतेस कीं काय ? सांगूं, कसले विचार चालले होते ते ? हं हं ! फसवतेस होय मला ? " मिस्कीलपणें तिच्याकडे पहात तो म्हणाला.

" तूं असा चावट आहेस. मी नाहीं जा उद्यांपासून तुझ्याबरोबर फिरायला येणार. "

" माझ्याबरोबर आतां कशाला येशील. आतां निराळंच माणूस मिळणार. अगदीं जिवाचं–प्यारं–लाडकं..."

" पुरे झाला चावटपणा. मी नाहीं जा तुझ्याशीं बोलत आतां. "

" नकोच, नकोच. काय हितगुज असेल तें त्यांच्याशींच बोल. आमचं गद्य बोलणं आतां तुला आवडेल तरी कसं ! "

" नाहींच आवडायचं. असलं गाध्य आवडेल तरी कसं कुणाला ? " किंचित् चिडक्या, किंचित् खिजविणाऱ्या स्वरांत ती म्हणाली.

" गाध्य ! गाध्य ही काय चीज आहे बुवा. "

" अजून कळली नसेल तर कान लांब कर म्हणजे सांगत्यें. "

" मला गद्धा बनवावयाचा विचार दिसतो तुझा. "

" आहेसच मुळीं तूं. "

लता चिडली आहे आणि आणखी कांहीं जास्त बोललें तर अधिक चिडेल असें पाहून, दादानें आपली जीभ आवरली; तितक्यांत घरहि पण जवळ आलें.

लतिका नुक्तीच बी. ए. झाली होती. परीक्षेच्या दगदगीनें श्रांत झालेल्या मनाला विसांवा देण्याकरितां ती कोंकणांत, आपल्या आजोळीं थोरल्या बंधूसह येऊन राहिली होती. तिला कोंकणचा दर्याकिनारा फार आवडे. ' पृथ्वीवर अवतरलेलं देवाघरचं तें एक काव्य आहे. ' असें ती वारंवार म्हणे.

लतिका भारतीय व युरोपीय सारस्वताच्या वाचनानें ध्येयवाद व काव्यात्मता यांकडे झुकत असलेल्या कांहीं युवयुवतींपैकीं एक होती. शेली, किटस्, टेनिसन, गेइटी, यीटस्, कालिदास, भवभूति, रविंद्रनाथ, कोल्हटकर, गडकरी हे तिचे जानी दोस्त. या वाग्भटांनीं निर्माण केलेल्या सौंदर्यसृष्टींत स्वैर विहार करण्यांतच ती आपला खरा आनंद मानीत असे; तिच्या जीवाचें विश्रांतिस्थान या ग्रंथकारांचे ग्रंथच बनले होते. यामुळें तिची आधींच कोमल असलेली मानसिक प्रकृति अधिक कोमल बनली होती. नुक्तेच तिच्या आजोबांनीं तिचें एका इंग्लंडरिटर्न्ड गृहस्थाशीं लग्न जुळवून आणलें होतें. हे गृहस्थ एक नांवाजलेले प्रोफेसर असून, एक उत्तम भाषाशास्त्रज्ञ म्हणून त्यांची ख्याति होती. लग्नाआधीं वधुवरांचा परस्परांशीं थोडासा तरी परिचय झालेला बरा असें वाटून, त्यांस दोन दिवसांकरितां म्हणून तिच्या आजोबांनीं मुद्दाम बोलाविलें होतें. या दोन दिवसांच्या परिचयानें लतिकेचे त्यांच्याबद्दल काय ग्रह झाले, त्याचें किंचितसें दिग्दर्शन समुद्रतीरावरील तिच्या आत्मगत विचारांतून झालेंच आहे. लग्न हे वेषांतर, विचारांतर किंवा जीवनांतर नसून दोन समसमान विचारांच्या, आचारांच्या आणि आकांक्षांच्या माणसांचें समान ध्येय गांठण्याकरितां परस्परांना सहाय्यभूत होणारें एक आदर्श सख्य आहे, असें ती म्हणे.

* * * * *

एका सुमुहुर्तावर देव-ब्राह्मणांसमक्ष लतिकेचा हात प्रोफेसरसाहेबांच्या हातांत देण्यांत आला. पुरोहितांनीं मंत्र म्हणत दोघांभोंवतीं सुताचे धागे

गुंडाळले, आप्तेष्टांनीं उभयतांचें मंगल चिंतून, मस्तकावर अक्षतांचा वर्षाव केला. पण दोघेंहि प्रेमाच्या धाग्यांनीं बांधलीं जात होतीं काय ? अगोचर अशा शक्तीकडून मांगल्याचा वर्षाव त्यांच्यावर होत होता काय ?

लतिकेनें आपल्या पतीच्या हस्ताचा अवलंब करून नूतन गृहीं प्रवेश केला. 'माझी लता देवदयेनं सुखी झाली. आयुष्य मात्र दोघांना देवानं द्यायला पाहिजे,' आईसाहेब कंठ दाटून म्हणाल्या. 'माझ्या लतिकेचें भाग्यच थोर,' वृद्ध आजोबा आनंदून म्हणाले.

* * * * *

लतिकेच्या सेवेला नोकरचाकर होते, रहावयाला सुंदर बंगला होता, फिरावयाला जावयाला छानदारशी मोटार होती, वाचावयाला हवीं तसलीं पुस्तकें मिळत होतीं, करमणुकीकरतां सुंदर सुंदर तंतुवाद्यें होतीं व तीं शिकवायला एक चांगला शिक्षकहि ठेविला होता. आणि ते शक्य तेवढें प्रेम करीत होते. पण—पण ?

* * * * *

पौर्णिमेची रात्र होती. चांदणें आल्हाददायी पडलें होतें. कुणीतरी स्वर्गांगना रुप्याचाच चूर जणूं उधळत आहे असें वाटत होतें. आभाळांत ताऱ्यांताऱ्यांतून सुंदर असा गीतध्वनि निघत होता. बागेंतून मंदमंद वाहणारा वायु त्याला साथ देत होता. शेजारींच ऐन बहरांत आलेल्या निशिगंधाच्या सुगंधानें सारा बंगला दरवळून गेला होता. तें सारें पाहून, बागेंत आरामखुर्च्या टाकून ताऱ्यांची मौज पहात किंवा सारंगीच्या साथीवर गीत गात तरी बसावें असें लतिकेला वाटलें. तिनें दोन खुर्च्या गड्याकडून बागेंत ठेवविल्याहि. पण ते कुठें होते ?

ते वाऱ्यापासून किंवा इतर गडबडीपासून त्रास होऊं नये म्हणून, साऱ्या खिडक्या आणि दारें बंद करून, पुस्तकानीं गच्च भरलेल्या खोलींत एका शब्दाची व्युत्पत्ति लावीत बसले होते. त्यांच्या सभोंवतीं मोठमोठे लॅटिन, ग्रीक, रशियन, फार्शी इत्यादि भाषांचे कोश अर्धे उघडे पडले होते; निरनिराळ्या भाषांतील व्याकरणाचीं लठ्ठ लठ्ठ जीर्ण पुस्तकें इतस्ततः पसरलीं होतीं.

लतिका अगदीं हलक्याच पावलांनीं त्यांच्या खोलीकडे गेली. दाराला आंतून कडी लावलेली होती.

तिनें हळुच दार खडखडावलें.

"कोण आहे ?" आंतून आवाज आला.

"मी. उघडायचं ना जरा दार !"

"हो. हो. आलोंच."

त्यानीं दार उघडलें. ती आंत शिरली.

"हं, नीट बघून चाल बरं. वाटेंतल्या पुस्तकांना अडखळून पडशील. काय पाहिजे होतें तुला ?"

"कांहीं नाहीं. आज म्हटलं चांदणं फार सुंदर पडलं आहे. अन् वाराहि खुब मजेचा वाहतो आहे."

"मग ! " डोळ्यांवरचा चष्मा वर करीत 'काय आहे तें लौकर एकदां सांगून टाक' असें सुचविणाऱ्या मुद्रेनें तिच्याकडे पहात ते म्हणाले.

"आपण खुर्च्या टाकून बसूं या का बाहेर, ताऱ्यांची मौज पहात ?" अगदीं लाडिकपणें त्यांच्याकडे पहात तिनें विचारलें.

"त्यांत काय एवढं पाहायचं. स्वस्थ झोंप जा. बाहेरचा वारा लागून थंडीबिंडी व्हायची एखादे वेळेला."

ती कांहीं बोलली नाहीं. मुकाट्यानें तिनें बाहेर जाण्याकरितां आपली पाठ फिरविली.

"हें पहा, रागावली नाहींसना ? पाहिजे तर येतों तुझ्या बरोबर बसायला. खुर्च्या टाकून ठेव. मी आलोंच पंधरा मिनिटांत. या एवढ्या 'दानव' शब्दाची व्युत्पत्ति लावतों आहें, तेवढी लावतों आणि येतों पहा पंधरा मिनिटांत. तूं बैस तोंपर्यंत. आलोंच मी."

ती त्यावर एक शब्दहि बोलली नाहीं. मुकाट्यानें खोलीच्या बाहेर येऊन ती बागेंतील खुर्चीवर पडली. प्रोफेसरसाहेब दाराला कडी लावून 'दानव' या शब्दाच्या व्युत्पत्तीचे दुवे जुळविण्यांत गर्क होऊन गेले.

तास गेला, दोन तास गेले. घड्याळांत एकाचा ठोका पडला. अजूनहि व्युत्पत्ती जुळली नव्हती. या शब्दाच्या पूर्वजाचा शोध लावण्याकरितां

त्याला त्यानीं कितीतरी ओढून ताणून, छेडून पाहिलें, पण तो दाद देण्याचा रंग दिसेना.

कांहीं वेळानें व्युत्पत्ति जुळली.

" हो, बरोबर, बरोबर ! डॅन्युब नदीच्या कांठीं राहणारे ते दानव ! हं, जुळली व्युत्पत्ति. देवांशीं युद्ध करणारे हे दानव डॅन्युब नदीचेच कांठीं रहात असावे. जुळली व्युत्पत्ति ! तसेंच, तसेंच ! " ते आनंदानें बेहोष झाले होते. कोलंबसाला, अमेरिकेचा शोध लागून जो आनंद झाला नसेल तो त्यांना यावेळीं झाला.

त्या व्युत्पत्तीची हकीगत आपल्या पत्नीला आपण केव्हां एकदां सांगतों असें त्यांना झालें. ती जेथें बसली होती तेथें ते आले.

" दानव शब्दाची व्युत्पत्ती लागली बरं ! डॅन्युब नदीच्या कांठीं राहणारे ते दानव. डॅन्युब, दानुब, दानब, दानव अशी याची व्युत्पत्ति आहे. ही डॅन्युब नदी कुठें आहे ती ठाऊक आहे तुला ? " तिला गदगदां हालवीत ते हर्षातिरेकानें ओरडले.

" अरे ! हें काय ? रडायला कां लागलीस ? अं, अं, काय झालं ? " ते चकित होऊन म्हणाले. उत्तर आलें नाहीं. रडण्याचें प्रमाण मात्र वाढलें.

तिला हुंदक्यावर हुंदके येऊं लागले. तिनें आपलें मुख बाजूला फिरविलें.

प्रोफेसरसाहेब स्तंभितच झाले. ' असं कां व्हावं, ' याचा ते विचार करूं लागले. त्यांनीं खुब विचार केला.

' दानव ' शब्दाची व्युत्पत्ति त्यांना लावतां आली, परंतु पत्नीच्या रडण्याच्या कारणाची व्युत्पत्ति मात्र त्यांना लावतां आली नाहीं !

# कुंदा

माझ्यानें तें दृश्य पाहवलें नाहीं. हृदय कळवळलें. डोळयांत अश्रू उभे राहिले. सर्व इंद्रियें बधिर झालीं. 'देवा रे ! माणसं इतका का निष्ठूर असतात !' बिचारी थरथर कांपत होती. लज्जेनें तिनें आपलें मुख पदरानें झांकून घेतलें होतें. "चांडाळणी माझ्या घरांतून अगोदर चालती हो," ती महामाया खिंकाळली. तिच्या बुचड्याला धरून तिला तिनें फरफरां रस्त्यावर ओढीत आणलें. "चल, जा कुठं ती !" तिनें धबाधब तिच्या कंबरेंत लाथा हाणल्या. 'अगाईग !' 'खा !' पुन्हां दोन लाथा बसल्या. तिनें दीनवाण्या नजरेनें हात जोडले.

स् स् स्. माझ्या सबंध शरीरांत सर्र झालें. 'बाई, नका हो तिला मारूं. तिन्हीसांजची वेळ,' मी पुढें जाऊन म्हणालें.

"तुम्हांला त्याची कशाला पंचाइत ! आपल्या वाटेनं सरळ चालत्या व्हा," एखाद्या डाकिणीप्रमाणें डोळे लाल करून ती खेंकसली. "पांढऱ्या पायांची ×× मला एकदां खाऊन टाकलंस म्हणजे शांत होशील." दांत ओंठ चावीत तिनें तिचा जोरानें गालगुच्चा घेतला.

'देवा रे !' ती आकांतानें ओरडली.

तिला त्या राक्षसिणीच्या हातांतून हिसकावून घ्यावें असें मला वाटलें. तसें करावें म्हणून मी पाऊलहि पुढें टाकलें. पण धैर्य होईना. नाइलाज म्हणून मन घट्ट करून बिऱ्हाडाकडे मी पाय वळविले.

माझें मन सारखें तिच्याकडे धांवत होतें. 'किती मी भ्याड ! त्याचवेळीं तिच्या हातांतून तिला सोडविली पाहिजे होती. छे ! छे ! मी हें योग्य केलें

नाहीं ?' मी स्वतःशींच पुनः पुनः म्हणूं लागलें. खोलींत पाऊल टाकतांच मी बिछाना गांठला. उशींत डोकें खुपसलें. माझं चित्त अत्यंत अस्वस्थ झालं होतं.

'भ्याड, भ्याड!' माझें मन मला सारखें टोंचूं लागलें.

मी उठलें, खोलीला कुलूप घातलें, बरोबर कंदील पेटवून घेतला व ज्या जागीं तो प्रसंग घडला त्या जागेच्या दिशेकडे पाय उचलले. माझें डोकें सारखें भ्रमण करीत होतें. 'बिचारीचं काय झालं असेल कुणाला ठाऊक!' मी माझ्याशींच पुटपुटलें. अर्धा-पाऊण मैल मी चालून गेलें असेन; कुणीतरी स्फुंदून स्फुंदून रडत असल्याचा भास मला झाला. मी दिवा जरा वर केला. वेशीजवळची ती धर्मशाळा होती. तेथूनच तो आवाज येत होता.

धर्मशाळेंत पाऊल टाकलें तों, तों—'अरे देवा! बिचारीची काय ही स्थिति! भगवन् तुमचं अंतःकरण पाषाणाचं का बनलं आहे! अजाण अबलेचे काय हे हाल!' तीच ती! बिचारी अंधारांत, कोपऱ्यांत तोंड खुपसून रडत होती. पाठीवरून मायेचा हात फिरवायला, मस्तक छातीशीं धरून, अश्रूंनीं डबडबलेले तिचे डोळे पुसावयाला तेथें कोणीहि नव्हतें. भोंवती भयाण अंधार पसरला होता. रात्र किरकिरत होती. मला पाहतांच ती दचकून उभी राहिली. 'भिऊं नकोस.' मी म्हणालें.

माझें हृदय भडभडून आलें. पदरानें मी तिचे डोळे पुसले. ती 'हो, हो' करून रडूं लागली. "रडूं नकोस," तिला जवळ ओढून, तोंडावर हात फिरवीत मी म्हणालें.

"माझ्या बरोबर चल. कांहीं म्हटल्या कांहीं सुद्धां मनांत आणूं नकोस. हें बघ, तुझ्या वयाच्या मुलीनं अशा वेळीं असल्या ठिकाणीं पडणं बरं नाहीं."

ती मुकाट्यानें माझ्या मागून चालूं लागली. मला किती समाधान वाटलें म्हणून सांगूं!

बिऱ्हाडीं येतांच तिच्याकरितां चटई अंथरली व अंमळ हुशारी वाटावी म्हणून स्टोव्ह पेटवून तिला चहा करून दिला. एखाद्या यंत्राप्रमाणें मी सांगेन तशी ती वागत होती.

मी झटपट हातपाय धुतले व स्वयंपाकाला लागलें. "मी हात लावूं

का ? " तिनें विचारलें. " नको, तूं स्वस्थ जरा पड ! " खिडकीला डोकें टेंकून ती बसली.

× × ×

" जाते कुठं × × सप्तपाताळांत दडाली तरी शोधून काढीन. अवलादच खराब ! "

" होय ! दडून बसते ! ! दडली असेल त्या घराला आग लावून देईन आणि बाहेर काढीन खेंचून ! "

ती कावरी बावरी झाली. तिचे डोळे गरगर फिरूं लागले. अंग थरथर कापूं लागलें.

मी खिडकींतून पाहिलें तों दोनचार कंदिलवाले मोठमोठ्यानें गर्जना करीत चालले होते. ते पुढें चालते झाले असें पाहतांच, तिला जरा स्वस्थता वाटली.

" बाई, मी जातें. ते बोलतील तसं करतील. ते महाचांडाळ......"

" घाबरूं नकोस, मी पाहीन काय तें. तूं स्वस्थ रहा. "

" ह्या गांवांतील लोक चांगले नाहींत. "

" नसेनात. मी उद्यांच इथून मुंबईला जाणार आहें. तूं माझ्या बरोबर ये. "

तिनें एक दीर्घ उसासा टाकला.

जेवण झाल्यानंतर मी तिला माझ्या शेजारींच अंथरूण घालून दिलें. सबंध रात्रींत तिचा डोळा लागला नसावा. ती सारखी तळमळत होती. एक दोनदां ती हळूच उठूनहि बसली. कसले तरी भयंकर विचार तिच्या डोक्यांत उठत होते. मलाहि झोंप येईना. " बाळ, नीज, नीज, उगा. विचारांनीं डोकें भडकून जाईल. " वात्सल्यपूर्वक तिच्या केंसावरून हात फिरवित समजवणुकीच्या स्वरांत मी म्हणालें. तिच्या केसांना हस्तस्पर्श होतांच तिच्या दुःखाला अधिकच कढ आला. तिच्या डोळयांतून झरझर अश्रु ओघळूं लागले. मी दिवा लावला आणि अंथरुणाजवळ गेलें. तिच्या उशा-गतचीं वस्त्रें भिजून चिंब झालीं होतीं. " नको रडूंस. देवाला काळजी आहे," तिचें डोकें हृदयाशीं धरून तिच्या पाठीवर हात फिरवीत मी म्हटलें.

" बाई, मी पापी आहें हो ! हें भ्रष्ट काळं तोंड..."

" एकादे वेळीं अज्ञानामुळं किंवा तात्कालीक मोहामुळें चुकून कांहीं तरी झालं असलं तर त्यांत पाप कसलं ? देव इतका निष्ठूर नाहीं. "

" चांगलं स्थळ पाहून आईबापांनीं मला या घरीं दिलं. माझं नशीबच फुटकं. नाहीं तर लग्नाच्या पंधराव्याच दिवशीं माझ्या सौभाग्यावर कां घाला पडता ! "

" त्या बाई तुझ्या सासू वाटतं ? "

" हो. अन् मघां हातांत लठ्ठ सोटा घेतलेला तो धटिंगण, चांडाळ, माझा दीर. त्याच्यामुळं...हाय रे देवा !......आतां हें तोंड जगाला दाखवूं तरी कसं ? बाई, नाना तऱ्हेच्या हाल अपेष्टा भोगल्या, फाटक्या चिंध्या वापरून दिवसचे दिवस काढले, हाणामारी सोसली, पण शील भ्रष्ट होऊं दिलें नाहीं. पण जगांतून एक दिवस उठण्याचं अदृष्टांत लिहून ठेवलं होतं. नाहीं तर त्या मांगाला—" तिला पुढें बोलवेना. दुःखाचे कढावर कढ येत होते. मीं तिचें हरतऱ्हेनें सांत्वन करण्याचा प्रयत्न केला, पण व्यर्थ ! कांहीं झालें तरी हिंदु विधवेचें मन तें !

गांवापासून स्टेशन जवळ जवळ दहा मैल होतें. मला दुपारची गाडी गांठावयाची असल्यामुळें मी सकाळीं एक छकडा ठरवून आणला व त्यांत सर्व सामान भरलें.

" माझ्याबरोबर मुंबईला येतेस ना ? "

ती कांहीं वेळ बोलेना. तिचें मन कसल्या तरी संशयांत घोंटाळत असावें. " तुला माझ्याबद्दल संशय येतो का ? तूं ज्यांच्या घरांत आतां उभी आहेस त्यांची मी भाची. हवापालट करण्याकरितां म्हणून मी इथं थोडे दिवस येऊन राहलें होतें. "

" छे, छे बाई, मला तसा मुळींच संशय आला नाहीं. तुम्हांला मी ओळखतें. तुमचं नांव मला ऐकून ठाऊक आहे. माझं मन घोंटाळत आहे तें एवढ्याचकरितां कीं माझ्यामुळं तुमच्या नांवावर..."

" त्याची तुला काळजी नको. माझं मी पाहून घेईन. केंस विंचर, हें लुगडं नेस आणि देवाचं नांव घेऊन माझ्या मागून चालूं लाग. "

मी सांगितल्याप्रमाणें तिनें केलें व मुकाट्यानें गाडींत येऊन ती बसली. किती गोड अन् मोहक तो चेहरा ! पण त्यानेंच तिचा घात केला होता.

\+ + + +

कुंदा सारी महिनाभरच आमच्याकडे राहिली, पण तेवढ्या अवधींत तिनें आपल्या गुणी स्वभावानें घरांतल्या लहानापासून थोरांपर्यंत सर्वांना आपलेंसें करून टाकलें. माझ्या या पन्नास पंचावन्न वर्षांच्या हयातींत अशा तऱ्हेची मुलगी मी पाहिली नाहीं. पोरगी देवता, खरोखरच देवता होती. तिच्या गुणांचें कांहीं तरी चीज व्हावें म्हणून माझ्या सामर्थ्याप्रमाणें प्रयत्न करण्याचें मी ठरविलें होतें आणि ते सफलहि झाले असते, परंतु विधीघटना वेगळी होती.

दिवसेंदिवस तिची मानसिक स्थिति चमत्कारिक होऊं लागली. आपली ही मनःस्थिति इतरांपासून लपवून ठेवण्याचा ती शिकस्तीचा प्रयत्न करी. मला त्याचें कारण समजून चुकलें. मलाहि तो एक पेंच पडला. हिची सुटका यांतून कशी करावी !

एक दिवस माझ्या धाकट्या भावाकडे मी कुंदेसंबंधीं गोष्ट काढली. तिची ती हृदयद्रावक हकीकत ऐकून त्याच्या डोळ्यांत अश्रू आले. “ विधवा सुंदर आणि सद्गुणी असणं हें पाप तर ! ” तो उद्गारला.

“ पाप नव्हे तर काय ? पापच ! लोकांना विधवा ही जणूं सार्वजनीक धर्मशाळाच वाटते. वाटेल त्या वाटसरानं यावं आणि तिचा उपभोग घ्यावा ! सर्वसाधारण समाजाची समजुतच अशी ! आमच्या एका प्रतिष्ठित नाटककारानें विनोदाच्या भरांत, ‘ विधवा ही बिनवारशी मालमत्ता, वाटेल त्यानें तिच्या-वर हक्क सांगावा, ’ असें आपल्या नाटकांत भरमसाट लिहिलेंच कीं नाहीं ! सामान्य लोकांच्या मनोरचनेचें तें प्रतिबिंब आहे. ” मी म्हणाल्यें.

त्याच्या डोक्यांत विचारांचें वादळ जोरांत सुरू झालें होतें. तो माझ्याशीं बराच वेळपर्यंत कांहींच बोलला नाहीं. मीहि स्तब्धच राहिल्यें.

पण मला ती स्तब्धता सहवेना. “ नाना ! स्तब्ध कां ? कसले विचार चालले आहेत डोक्यांत ? ”

“ उपाय शोधतों आहें. ”

" झटपट सांपडला तर उपयोग ! "

" उद्यां सकाळीं निश्चित सांगतों बघ. "

\+ + + +

सकाळ उजाडली. नाना कोणता उपाय शोधून काढतो हें समजण्याची माझी उत्सुकता विलक्षण वाढली होती.

त्यानें जो उपाय सांगितला, तो ऐकून मी थक्कच झालें. पण दुसऱ्या क्षणीं मला त्याजबद्दल अभिमानहि वाटला. मी त्याजकडे टकटक पहात होत्यें.

"अशी माझ्याकडे पहातेस काय ? यावांचून मला दुसरा मार्ग दिसत नाहीं."

" तूं पण त्याचा नीट विचार केला आहेस का ? तसं झालं तर काय परिणाम होतील—"

" खुळी ग खुळी; इतकीं वर्षे जवळ राहून तुला कांहीं माझी ओळख झाली नाहीं. कालची सबंध रात्र जागून काढली ती व्यर्थच का ? परिणाम काय होतील तें मी जाणून आहें. परंतु त्यांना तोंड देण्याएवढी माझ्यांत हिम्मत आहे. तूं घाबरूं नकोस. तिला या गोष्टी नीट समजावून सांग व संमती घे. माझी तयारी आहे. "

" भगवंताची मर्जी ! "

त्या दिवशीं कुंदेला मी मलबार टेंकडीच्या बाजूला फिरावयाला नेलीं आणि तिला सर्व गोष्टी नीट समजावून सांगितल्या. ती निमुटपणें सर्व ऐकत होती. शेवटीं तिनें एक दीर्घ उसासा टाकला.

" मग काय ? हो म्हणूं ना मी त्याला ? "

आई " माझ्यासारख्या पापी माणसाशीं—"

" अं हं. असं बोलूं नये. सांगतें तसं वाग. वेडी कुठली ! पाप, पाप ! अजाणतां झालेल्या चुक्यांबद्दल आपण दोषी नसतों. वेडी ! " ती पुढें कांहीं बोलली नाहीं.

रात्रीं मी आणि नाना आर्यसमाजाच्या दोघां सभासदांना जाऊन भेटलों व सकाळीं फारसा गाजावाजा न करतां मंदिरांत लग्नविधि उरकून घ्यावयाचें

ठरविलें. बिऱ्हाडीं येतांना अशोक स्टोअर्समधून एक सुंदर शालू विकत घेतला व कुंदेला भेट म्हणून दिला.

" आई ! " तिनें माझे पाय धरले. तिचा कंठ सद्गदित झाला. घळकन् दोन अश्रुबिंदु माझ्या पायांवर पडले.

" माझ्या बाळीचं कल्याण होईल बरं ! " तिला उचलून मी माझ्या पोटाशीं धरलें. " उद्यां सकाळीं आर्यसमाजमंदिरांत विवाह उरकून घ्यायचं ठरविलं आहे. "

पहांटेस मोठ्या उत्साहानें उठलें. नानाही पोशाख करून तयार झाला.

' कुंदा, कुंदा ! ' तिच्या खोलीकडे जाऊन मीं हांक मारली. उत्तर आलें नाहीं म्हणून मी दार उघडून आंत गेलें.

" ही तर शालु नेसून तयार आहे ! कुंदे ! " मी पुढें जाऊन हांक मारली. तिनें उत्तर दिलें नाहीं. " हें ग काय ! यावेळीं झोंप कसली आली तुला " तिला हलविण्याकरितां म्हणून मी तिच्या पाठीवर हात टाकला. तों काय ? अको तो प्रसंग ! बिचारी क्षणैक चमकून या निष्ठूर जगांतून निघून गेली.

नानानें टेबलावरून कसलासा कागद उचलला, " काय रे तें ? "

त्यानें तो माझ्यापुढें केला.

" आपल्याला न सांगतां निघून गेलें याचा राग मानूं नका. आपण केलेल्या उपकारांचें ऋण जन्मोजन्मींहि मला फेडतां येणार नाहीं. माझ्या भ्रष्ट देहानें नानासाहेबांसारख्या पुण्यवान पुरुषाला विटाळवूं नये, म्हणून मी हा मार्ग स्वीकारला स्वतःच्या स्वार्थासाठीं त्यांच्या सारख्यांच्या आयुष्याची खराबी करणें मला योग्य वाटलें नाहीं, आत्महत्येबरोबर एका दुर्दैवी जीवाची हत्या करण्याचें मी पाप करीत आहें, हें मला ठाऊक आहे. पण माझा नाइलाज. परलोकीं या पापाबद्दल ज्या यातना सोसण्याचें नशिबीं येईल त्या भोगण्याचा मी निर्धार केला आहे. येतें मी आतां. गैरसमज करून घेऊं नका, "

आपणा सर्वांची ऋणी, कुंदा.

कुंदे ! तुझ्यासारखे अभागी जीव या हिंदुसमाजांत किती तरी असतील ! लाथाबुक्या खात एका बाजूला कुढून मरायचें, याशिवाय समाजानें तुझ्यासारख्या बालविधवेला दुसरा मार्गच ठेवलेला नाहीं !

# युवतिहृदय



डॉक्टरीच्या शेवटच्या परीक्षेंतून ती नुक्तीच यशस्वी रीतीनें बाहेर पडली होती. पुढें काय करावें याबद्दल तिचे विचार चालले होते. ' कुठल्या तरी इस्पितळांत नोकरी पत्करून स्वतंत्रपणें आयुष्य घालवावें.' तिला एकदां वाटे. ' पण छे, हें शक्य आहे का? आपल्यावर कुणीतरी'–हा विचार डोक्यांत येतांच तिच्या हृदयांत विलक्षण खळबळ उडे. छाती धाड् धाड् उडूं लागे. श्वासोच्छ्वास जोरजोरानें सुरू होई. ' हो, माझ्यावर कुणी-तरी प्रेम करायला पाहिजे. नाहींतर–नाहींतर–नाहींतर–काय?' ह्या विचारानें ती अन्यमनस्क होई व दिवसच्या दिवस तिच्या हृदयांत ' नाहींतर–नाहींतर काय?' हाच एक प्रश्न सारखा घुमत राही.

मनाच्या या द्विधा स्थितींत कित्येक दिवस निघून गेले. प्रश्नाचा निकाल लागला नाहीं. उलट तो अधिकाधिकच बिकट होत चालला. खिडकी शेजारीं तळहातावर डोकें ठेवून, शून्य दृष्टीनें ती तासच्या तास विचार करीत पडलेली आढळे.

वर्षर्तु संपला, शरद्हि निघून गेला; पण तिच्या उदासीन चर्येवर कांहींच फरक घडून आला नाहीं. ते आले केव्हां आणि गेले केव्हां याचेंहि तिला स्मरण नव्हतें.

या ऋतुद्वयांच्या मागून आपल्या कोमल चरणांतलि नूपुरांचा रुमझुम् आवाज करीत वसंताची स्वारी नाचत नाचत आली. त्याच्या प्रत्येक पदनि-क्षेपाबरोबर वसुंधरेचें हृदय धाड्धाड् होऊं लागलें. तिनें आपले डोळे किंचित्

उघडले आणि त्याच्याकडे चोरट्या नजरेनें पहात ती गालांतल्या गालांत हंसली. त्यानेंहि स्मित केलें. दोघांना ही एकमेकांची खूण पटली. इतके दिवस डहाळयांच्या दाट जाळींत तोंड खुपसून बसलेली कोगुळ आपलें चिमणें डोकें हळूंच बाहेर काढून खट्याळपणें ओरडली, ' कुहू कुहू ', ' काय खट्याळ तरी मेली !' मानेला हिसडा देत पण गालांतल्या गालांत हंसत ती पुटपुटली. हें सारें पाहून वसंताला गुदगुल्या होऊं लागल्या. त्याच्या अर्धस्फुट ओष्ठांतून हास्याची मृदु लकेर बाहेर पडली आणि त्या लकेरीबरोबरच दशदिशांत सौगंधी सौगंध पसरला. प्राणीमात्र आनंदानें डुलूं लागले. तरुण-तरुणींच्या सुप्त हृदयांत गोड हुरहुर सुरू झाली. वासंतिक सुधेच्या मादक पानानें झिंगलेल्या त्यांच्या हृदयांत ' प्रेम, प्रेम, प्रेम ' हा एकच शब्द निनादूं लागला.

साऱ्या सृष्टींत अकस्मात घडून आलेल्या या अपूर्व बदलाचा परिणाम प्रमिलेच्या युवतिहृदयावर झाल्याशिवाय कसा बरें राहील ? विचारांच्या वादळांत हेलकावे खात असलेलें तिचें हृदय किंचित स्थिर झालें. अतिरिक्त विचारांनीं मलीन झालेल्या तिच्या चेहऱ्यावर कसलें तरी तेज चमकूं लागलें. गालांवरील पांडु रंगाची हकालपट्टी करून गुलाबी रंगानें त्याचें स्थान पटकाविलें. तिच्या डोळयांत कसली तरी गोड आशा डोकावूं लागली. " हो. प्रेमच, मला प्रेमच पाहिजे. प्रेम हेंच स्त्रीचं जीवन. त्याशिवाय जगणं शक्य आहे का ? छे, छे, कदापि नाहीं. प्रेम, मला प्रेमच पाहिजे. प्रेम करणारं व करवून घेणारं माणूस जवळ असल्याशिवाय कसलं जगणं ! स्वातंत्र्य ! स्मशानांतलीं भूत पिशाच्चं नसतात का स्वतंत्र ? नको, तें भिकारडं स्वातंत्र्य मला नको. मला प्रेमच पाहिजे. "

प्रेम, प्रेम, प्रेमाच्या मदिरेनें ती पूर्ण बेहोष झाली. कांहीं वेळानें तिला काय वाटलें कुणाला ठाऊक; ती टेबलाजवळच्या भव्य बिलोरी आरशासमोर उभी राहिली. " इश्श, काय हा माझा घाणेरडा पोशाख ! अंगावर हा ठेवला तरी कसा मला ! " तिनें आपल्याच अव्यवस्थित मळकट पोषाखाकडे पाहून नाक मुरडलें. " आज तो गुलाबी शालू काढावा बाहेर. "

## युवतिहृदय

तिनें खोलीचें दार बंद करून घेतलें व चर्मपेटींतून एक जरीच्या किनारीचा सुंदर गुलाबी शालू काढून ती नेसली. तिनें एकवेळ मागें पुढें मुरडून शालूवरून हात फिरविला व पुन्हा ती आरशासमोर येऊन उभी राहिली. ' किती गोड हा चेहरा ! ' केंसांवरून व गालांवरून हात फिरवीत ती आपल्याशींच पुटपुटली. आपल्याच लुसलुशीत गालांचा साखरचुंबा तिला घ्यावासा वाटला कीं काय कोण जाणे; तिनें आपलें मुख जवळ नेलें. पण अकस्मात् काय झालें कुणाला ठाऊक. तिच्या सर्व अंगास कंप सुटला. सबंध शरीर लटलट कापूं लागलें. तिची कंबर खचल्यासारखी झाली आणि ती मटकन् खालीं बसली.

" मीं काय चालविलं आहे हें ! एका बालविधवेला–प्रेम–प्रेम–प्रेमाचे पुसट देखील विचार मनांत आणणं योग्य आहे का? छे, मीं केवढं पाप केलं! माझी दृष्टि माझ्या या पांढऱ्या फटफटीत कपाळावर आधींच कशी गेली नाहीं. इतके दिवस मला ही कशी भुरळ पडली ! छे, छे ! माझ्यासारखी पापी मीच. हुंऽऽ" तिचें चित्त बधीर झालें. आपण प्रेमाचें चिंतन करण्यानें भयंकर पाप केलं असें तिला वाटूं लागलें. देवाच्या दरबारांत आपल्याला याबद्दल अत्यंत कडक शिक्षा होईल असें तिचें भाबडें हिंदु मन तिला सांगूं लागलें. पण कांहीं वेळानें तिचें खरेंखुरें युवतिहृदय जागृत झालें. ' पति-सुखाची यत्किंचितहि झुळुक न लाभलेल्या तरुण बालविधवेला आपणावर कुणीतरी व कुणावर तरी आपण प्रेम करावंसं वाटल्यास त्यांत तिनं कसलं पाप केलं ? विधवा ही मनुष्य नाहीं का ? तिला अंतःकरण नाहीं का ? तिला भावना नाहींत का ? जर ह्या साऱ्या गोष्टी आहेत, तर मग तिनं प्रेमाचं चिंतन केलं तर त्यांत पाप कसलं आलं ? पण समाज–समाज —' समाजाच्या शासनरूपी अक्राळ-विक्राळ सैतानाचें भेसूर चित्र तिच्यासमोर उभें राहतांच तिची छाती हादरली, तिच्या सर्व शरीरांत कंप सुटला.

संध्याकाळ झाली. चंद्र बराच वर आला आणि त्याचे शुभ्र रुपेरी किरणहि खिडकीवाटे खोलींत डोकावूं लागले. ती वर उठली आणि खिडकीजवळ येऊन उभी राहिली. जिकडे तिकडे अपूर्व प्रसन्नता पसरली होती. शेजारच्या रात-राणीच्या मंडपाखालील चवुतऱ्यावर दोन व्यक्ती कांहींतरी गुजगोष्टी करीत

बसल्या होत्या. ' कोण बरं असतील हीं ? ' ती मनांत म्हणाली. ' हो, दादा आणि वहिनीच ! इतकं काय बरं बोलत असतील हीं ? ' तिनें आपले कान त्या बाजूला टवकारले. बराच वेळपर्यंत तिला कांहींच ऐकूं आलें नाहीं. कांहीं वेळानें थंडगार अशी एक झुळुक आली व त्याबरोबरच मोठ्यानें उच्चारलेले पुढील शब्द तिच्या कानीं पडले, ' थंडीनं किती बरं हुडहुडूं लागलीस ही ? चढवूं का हा ओव्हरकोट अंगावर ? ' तिनें आपले डोळे ताणून पहाण्याचा प्रयत्न केला. तिचा दादा आपल्या पत्नीच्या अंगावर हलकेच ओव्हरकोट चढवीत होता.

तिनें एक दीर्घ निश्वास सोडला. ' माझ्या आयुष्यांत मला असं जिव्हाळ्यानं जवळ घेऊन कुणी म्हणेल का ? छे, पण माझ्यासारख्या विधवेनं असे विचारसुद्धां मनांत आणणं पाप आहे. ' प्रमिलेच्या तरुण अंतःकरणांत पुन्हा खळबळ उडाली. तिनें आपलें मस्तक भिंतीला टेकलें.

# गोत्राचें भूत !

त्यांच्या लेखणींत अशी काय जादु भरली होती कुणाला ठाऊक. त्यांची प्रत्येक ओळ, प्रत्येक शब्द पुनः पुन्हां वाचावासा वाटे. त्यांच्या लघुकथांनीं तर कित्येकांना विलक्षण वेड लावून टाकलं होतं. ज्याच्या त्याच्या तोंडीं 'शामसुंदर'...स्...माझा हात असा कापूं कां लागला ? छ ! ही हृदयाची धडधड...हूंऽऽ...अश्रुंनो, तुम्हीं डोळ्यांतल्या डोळ्यांतच...शामसुंदर, शामसुंदर ! माझा जिव...छे ! हें मी काय करतें आहें ? हो, त्यांचं नांव ज्याच्या त्याच्या तोंडीं झालं होतं. आम्हां तरुणींमध्यें त्यांचं नांव निघालं म्हणजे तर तासचे तास त्यांच्या कृतींवर चर्चा चाले. स्त्रीहृदयाचं मार्मिक चित्र रेखाटणारा त्यांच्याएवढा कुशल लेखक आजवर कुणी झाला नाहीं असं म्हणतात. त्यांच्या 'मंगला' व 'पथभ्रष्टा' या गोष्टी वाचतांना कांहींच्या डोळ्यांतून टपटपां अश्रू गळतांना मी पाहिले आहेत. आमची माई पटवर्धन एवढी पुरुषी अंतःकरणाची ना, पण ज्या दिवशीं 'महाराष्ट्र-प्रतिभेंत' 'मंगला' प्रसिद्ध झाली त्या दिवशींचें तिचें तें स्फुंदून स्फुंदून रडणं मला अजूनहि आठवतं. जाऊं द्या, मला जें काय सांगायचं होतं तें राहिलं एका बाजूला, अन् भलतंच कांहींतरी लिहीत सुटलें आहे.

• हो, तो शुक्रवारचा दिवस होता. शाळा लवकर सुटल्यामुळें मी लवकर घरीं परतलें होतें. आई एका वृद्ध गृहस्थांशीं कांहींतरी बोलत बसली होती. "हीच का तुमची सुंदर ?" माझ्याकडे पाहून ते गृहस्थ म्हणाले. मला किंचित् लाजल्यासारखें झालें. हातांतलीं पुस्तकें मी कोनाड्यांत कशींबशीं कोंबलीं व खोलींतून लगबगीनें पाय काढला. "पार्वतीबाई, खरोखरच

सांगतों. शाम व सुंदर यांचा हा जोडा कसा उत्तम शोभेल "...उंबरठ्याच्या बाहेर टाकण्याकरितांच उचललेलें माझें पाऊल जिथल्या तिथेंच थांबलें. " तुम्हीं कांहीं म्हणा. मला हीच सून हवी, " ते म्हणाले. माझें हृदय धड-धड होऊं लागलें. मी कान टवकारून ऐकूं लागलें. " ईश्वराची मर्जी !" आई उद्गारली. " बरं, मी आतां जातों. उद्यां आपण त्याबद्दल बोलूं. " " ठीक " आई म्हणाली.

त्या रात्रीं माझी पापणीला पापणी कांहीं भिडली नाहीं. " शाम ! हे शाम कोण ? ते नसतील ना ?...छे, भलतीच कांहींतरी आशा...मग हे कोण ? " माझी सारखी चुळबुळ चालली होती.

आईला विचारावें असें पुष्कळदां वाटलें, पण धैर्य होईना. दुसऱ्या दिवशीं मी नानाला एका बाजूला नेऊन भीत भीत विचारलें, " कालचे ते वृद्ध गृहस्थ कोण रे ? " " तुझ्या त्यांचे वडील. " " चल ! चहाटळ कुठला. " या भलत्याच थट्टेबद्दल मला त्याचा राग आला. मी फणकाऱ्यानें निघून जाऊं लागलें. " ह्यः ह्यः ह्यः, अग ए पोरी, अशी रुसतेस काय ? भारीच उतावीळ ! इकडे ये, ' महाराष्ट्र–प्रतिभेंत ' ' शामसुंदर' या नांवानें गोष्टी लिहितात ना, त्यांचे हे वडील. " " खरंच ! " मी आश्चर्यमिश्रित आनंदातिरेकानें ओरडलें. पण दुसऱ्याच क्षणीं माझी मलाच लाज वाटली. हो, मी काय केलं हें ! सारं गुपीत बाहेर पडलं ना ! मी एक क्षणहि तिथें थांबलें नाहीं. खोलीकडे धूम ठोकली.

त्या दिवशीं मी कांहीं या पृथ्वीवर नव्हतें. कुठल्यातरी अंतराळांतल्या नंदनवनांत मी अन् माझे शाम...तारे, माझ्यानें आतां लिहवत नाहीं ग ! माझा हात पुन्हां थरथर कापूं लागला आहे, डोकें अगदीं शून्य झालं आहे, अन् कंबर खचल्यासारखी झाली आहे. नको नको,...हो पण नको म्हणून कसं चालेल ? तुला दोन वर्षांपूर्वी दिलेलं वचन मला पुरें केलेंच पाहिजे.

मी शामसुंदरांना पूर्वी कधींच पाहिलं नव्हतं. ते गोरे आहेत कीं काळे आहेत, सुरूप आहेत कीं कुरूप आहेत, खुल्या दिलाचे आहेत कीं कुढया मनाचे आहेत, रागीट आहेत कीं प्रेमळ आहेत, याची मला कांहींच माहिती नव्हती. असणार कुठून ? चारपांच वर्षें ते बंगालमध्यें रवींद्रनाथांच्या आश्र-

मांत वाङमयाच्या अभ्यासाकरितां म्हणून राहिलेले आणि याच काळांत त्यांच्या लेखनाला सुरवात झाली. ज्याच्या त्याच्या तोंडून त्यांचं नांव ऐकूं येऊं लागलं. त्यांचे लेख व गोष्टी वाचून मी माझ्या मनाच्या कुंचलीनं त्यांचं तेजस्वी असं एक चित्र चितारलं होतं. याच चित्रानं त्या दिवशीं मला न कळूं देतां माझ्या हृदयांत हळूच प्रवेश केला.

" शाम-सुंदर ! काय विधिघटना आहे पहा ! नांवसुद्धां शाम-सुंदर ! अगोदरच सारी योजना ! ते शाम, अन् मी सुंदर. शाम अन् मी गेल्या जन्मीं..." पुढील गोड कल्पनेनं मी स्वतःशींच लाजलें. " का ग, वेड लागलं कीं काय ? आंचवायला आलीस अन् हातवारे करायला काय लागलीस ! आहे काय प्रकरण ? कुणी जखणीनं झपाटलं बिपाटलं नाहीं ना ? नाना बघ रे हिला खास वेड लागलंय ", खरकटीं भांडीं बाहेर ठेवण्याकारितां येत असलेली आई मोठ्यानें हंसत म्हणाली. मी एकदम दचकून जागी झालें. मी आंचवायला म्हणून आलें ती तशीच वेड्यासारखी उभी होतें.

जगाची मला स्मृती कुठं होती ! मी अन् शाम, हेंच माझं जग त्यावेळीं बनलं होतं. अमिष्ट—त्या दिवशीं मी पुरी पुरी अमिष्ट बनलें होतें. चोवीसहि तास एकच विचार. ' शाम अन् मी. ' त्यादिवशीं मी शाळेंत गेलें. पण कोण फजिती ती ? तारे, तुझी हंसून हंसून मुरकुंडी वळेल. पहिलाच तास संस्कृतचा होता. माझा वर्गांत पहिला नंबर असल्यामुळें घारपुऱ्यांनीं ' राम ' हा शब्द मला पहिल्यानं चालवायला सांगितला. मी ताडकन् उठून चालावयाला सुरवात केली. ' शामः शामौ शामाः ' वर्गांत हंशाच हंशा पिकला ! मी विस्मयानं आजुबाजूला पाहिलं, तों मुली जास्तच हंसूं लागल्या. ' सर'हि हंसूं लागले. मंडळी कां हंसते, हेंच मला समजेना. " का ग सुंदर, हा शाम कुठला काढलास ? मी तुला ' राम ' हा शब्द चालवायला सांगितला ना ? " सर म्हणाले. माझ्या डोक्यांत लखकन् प्रकाश पडला ! लज्जेनं मी तोंड खालीं केलं व धाडकन् खालीं बसलें. कोण फजिती ही ! मुली आतां कांहीं मला स्वस्थ बसूं देणार नाहींत !

शाळा सुटल्यावर मी लगबगीनं पाऊल उचललं. न जाणो, मुली थट्टा करकरून जीव सळो कीं पळो करून सोडायच्या ! मोठ्या उत्सुकतेनं मी

इकडे तिकडे पहात घरांत पाऊल टाकलें. शामसुंदरचे वडील आजहि आईशीं बोलत बसले होते.

पांय न वाजवितां मी खोलींत गेलें व दार आड करून माजघरांतील त्यांचीं बोलणीं ऐकूं लागलें. पण माझ्या कानांत काय पडलें?...

"हो खरं, तुमचं आणि आमचं गोत्र एक नव्हे? मग कसं जुळणार? माझ्या लक्षांतच ती गोष्ट आली नाहीं...च्."

"सुंदर नाहीं तर नाहीं, त्यांत काय मोठं! आमच्या सुशीची—" याच्या पुढलं ऐकावयाला मी कुठं शुद्धीवर होतें?

* * * * *

मी माझे जड झालेले डोळे उघडले, खोलींत मिणमिण दिवा जळत होता. खिडकींतून रातकिड्यांचा किर्र किर्र असा आवाज येत होता. सर्वत्र निःस्तब्धता पसरलेली होती. आई उशाशीं बसून चमच्यानें माझ्या तोंडांत दूध घालीत होती. नाना ऊन पाण्याच्या बाटलीनें पाय शेकीत होता.

"आई,!" मी क्षीण आवाजांत म्हणालें.

"लवकरच बरी होशील बरं बाळ. सुशीलेच्या कमलची पाठराखीण म्हणून तूं जाणार ना?"

"कमलची पाठीराखीण!" होती नव्हती तेवढी शक्ति एकवटून मी मोठ्यानं विचारलं.

"हो बरं. सुशीच्या कमलला अण्णा परांजप्यांच्या शामसुंदरला द्यायचं ठरलं आहे."

"शामसुंदर!" मी एकदम किंचाळलें. माझी शुद्धी नाहींशी झाली.

* * * * *

मंगलवाद्यें वाजत होतीं. ब्राम्हण मंत्र म्हणत होते. कमलेला नानानें अंतरपाटाच्या मागें उभें केलें होतें. पलिकडे शाम उभे होते. मी सज्जांत उभी होतें. आहा, किती सोज्वळ रूप तें! मी धाड्धाड् जिना उतरून बोहल्याकडे धांवत सुटलें. मला त्या कमलटीचा राग आला होता. 'हिचा काय अधिकार? शामसुंदर माझे.' थाडकन् तिच्या कंबरेंत लाथ हाणून तिला मी मागें खेंचलें. पुढील हकीगत मला आठवत नाहीं.

## गोत्राचें भूत

मी दोन महिनेपर्यंत वेड्याचा इस्पितळांत होतें. तारे, माझी सध्यांची स्थिति अशी व्हायला काय कारण झालं, याचा उलगडा तुला आतां होईल. मागें मला वचन दिल्याप्रमाणें ही गोष्ट मात्र कुणाला सांगू नकोस. आतांपर्यंत ती मी कुणालाच सांगितलेली नाहीं. तूं हट्टच धरलास म्हणून सांगितली.

× × ×

परवां मोडक्या बाजारांत एखादें सुंदर पुस्तक थोडक्यांत पडल्यास पहावें ह्मणून हिंडत असतां एका पुस्तकविक्याजवळ गाय द मोपसांची—माझ्या आवडत्या ग्रंथकाराची–Woman's life ही कादंबरी नजरेस पडली. किंमत विचारतां त्यानें आठ आणे सांगितली. मी झटकन् आधेली त्याच्या अंगावर फेंकली व पुस्तकाचीं पानें चाळूं लागलों, तों हुरमुजी मोत्यांसारख्या अक्षरांत, जीर्ण झालेल्या कागदांवर कुणीतरी वरील मजकूर लिहिलेला मला आढळला. मजकूर महत्वाचा वाटल्याकारणानें आपणापुढें जशाचा तसा लिहून ठेवीत आहें.

# पण पर्वा कुणाला ?

" The vilest deeds like poison weeds,
Bloom well in prison air;
It is only what is good in man
That wastes and whithers there.

—Oscar wilde

आजूबाजूला पहात पावलें न वाजवितां तो जिना उतरत होता. छाती धडधड होत होती. त्याचे पाय लटलट कांपत होते. कुणीसें खालच्या बाजूला जोरानें खांकरलें. त्याच्या पोटांत ' धस्स ' झालें. आधींच काळवंडलेला त्याचा चेहरा ज्यास्त काळवंडला. तो जिथल्या तिथेंच थबकला. डोळे ताणताणून त्यानें आजुबाजूला पाहिलें, नीट कानोसा घेतला व ' असंच कुणीतरी असेल झालं ! ' अशी आपल्या मनाची समजूत करून घेऊन, राहिलेल्या पायऱ्या कशाबशा उतरून त्यानें रस्ता गांठला. फर्लांग अर्धा फर्लांग चालून गेल्यावर तो किंचित् थांबला. तो आपल्याशींच कसला तरी विचार करीत होता. संध्याकाळ आणि त्यांतून रविवारचा दिवस असल्यामुळें चौपाटीवर जाणाऱ्या लोकांची या रस्त्याला फारच गर्दी होती. व्हिक्टोरिया आणि मोटारी यांची रांगच्या रांग लागली होती. ' जावं झालं तिकडेच ' तो आपल्याशींच पुटपुटला. चौपाटीच्या दिशेला त्यानें आपले पांय वळवले.

सूर्य बराच खालीं आला होता. संध्येनें आपले दिगन्तव्यापी सांवळे पंख पसरावयाला सुरवात केली होती. रविकिरणांच्या त्रासामुळें संतप्त झालेली वसुंधरा शांत होऊं लागली होती. पश्चिम क्षितिजावर क्षणोक्षणीं बदलत असलेले मोहक रंग, संबंध दिवसाच्या श्रमानें श्रांत झालेल्या कामकरी जनांच्या चेहऱ्यावर आनंदाच्या आणि उत्साहाच्या छटा उमटवित होते. जिकडे तिकडे अगदीं शांत होतें.

# पण पर्वा कुणाला ?

श्रीधरला आज कित्येक दिवसांनंतर समुद्राचें दर्शन होत होतें. एका बाजूला निवांतशी जागा पाहून त्यानें आपलें अंग रेतीवर टाकलें. हातावर डोकें ठेऊन तो अनिमेष नेत्रांनीं जाणाऱ्या येणाऱ्या लोकांकडे पहात होता.

" हा ईश्वरी न्याय ! ही समता ! " त्यानें एक दीर्घ निश्वास टाकला " सचोटीनं वागणाऱ्यानं हातांत करवंटी घेऊन दारोदार हाल, अपमान सोशीत फिरायचं आणि लोकांच्या माना मुरगळून पुष्ट झालेल्या बोक्यांनीं मोटारी उडवयाच्या, ऐषआराम भोगायचे. हा सत्याचा जय ! थंडीनं हुडहुडत अन्नाविण दिवसचे दिवस तळमळण्याचं नशिबीं येणं हें सत्याचाराचें फळ ! ! ह्यँ ह्यँ ह्यँः ! " त्याच्या त्या चमत्कारिक हास्यानें आजुबाजूला बसलेले लोक दचकले व भीतीयुक्त नजरेनें त्याच्याकडे पाहूं लागले.

" हूं ऽऽ ! " तो उठला व आजुबाजूला न पाहतां चालूं लागला—चालूं लागला म्हणण्यापेक्षां कसें बसें आपलें शरीर पुढें लोटूं लागला. त्याचें डोकें यावेळीं गरगर फिरत होतें, पांय लटलट कांपत होते, डोळयापुढें अंधेरी येऊं लागली होती. कशींबशीं दहावीस पावलें त्यानें टाकलीं. पण पुढें ?—पुढें पाय उचलवेना. घेरी येऊन धपकन् तो खालीं पडला. लोक जमा झाले. 'ही दारु, दारु ! ' कित्येक दांत विचकीत ओरडले. सभोंवतीं कडें पडलें.

" क्या है, क्या है, " पोळासारखें आंत घुसत काळया डगलेवाल्यांनीं विचारलें.

" ए सैतान ! ए साला, उठो उठो. " त्याला लाथा मारीत एक डगलेवाला ओरडला.

" ए साला, ऊठ ! थोडीच दारु ढोकावी." त्याच्या हाताला हिसका देत दुसरा खेंकसला.

" हः हः हः " कांहीं सभ्य प्रेक्षक बेंबीच्या देंठापासून हंसले.

• " बाप रे ! " तो एकदम किंचाळला. आपले जड झालेले डोळे उघडण्याचा त्यानें प्रयत्न केला.

" ए बदमाश ! उठ " शिपाईदादांनीं परत एक लाथ हाणली.

त्याला चेव आला. त्यानें दांत ओंठ चावले. कसा बसा तोल सांवरून तो उभा राहिला व होती नव्हती तेवढी शक्ति एकवटून त्यानें शिपाई-

दादाच्या नाकावर ठोसा लगावला. " हरामखोरा, मी बदमाश ! मी बद-माश ! " चवताळून त्यानें त्याच्या नरड्याला हात घातला. दुसऱ्या दोघां शिपायांनीं त्याला मागें खेचलें नसतें तर शिपाईदादांनीं खास स्वर्ग पाहिला असता. पण त्यांचें नाशिब शिकंदर ! कारभारणीचें सौभाग्य बळकट !

श्रीधरच्या हातांत बेड्या पडल्या. ' दारुड्या तो दारुड्या, अन् वर शिरजोर ! असंच पाहिजे या लोकांना बक्षिस ! नाहींतर ताळ्यावर यायचे नाहींत हे ! ' कांहीं महात्मे म्हणाले.

तुमच्या सारख्या गलेलठ्ठांची टाळकीं चांगलीं शेकलीं म्हणजे ताळ्यावर येतील ! " ते पृथ्वीवरील यमदूत फरफरां ओढून नेत असतां, करकरां दांत चावीत मागें वळून तो म्हणला.

दुसऱ्या दिवशीं मारामारीचा आरोप ठेवून त्याला न्यायाधिशासमोर उभें करण्यांत आलें.

" मी निरपराधी आहें. गेले पांच सहा दिवस माझ्या पोटांत अन्न नाहीं कीं पाणी नाहीं. फुटाणे घेऊन खाईन म्हटल्यावर एक दिडकीसुद्धां खिशांत नाहीं. आज वर्षभर बेकार स्थितींत आहे. खाणावळवाल्याच्या तगाद्यानें विटलों आहें. कुठें तरी एका बाजूला पडावें म्हणून चौपाटीवर गेलों. पायांत त्राण राहिलें नव्हतें, पोटांत वणवा पेटला होता, डोकें गरगर फिरत होतें, घेरी येऊन मी खालीं पडलों. पण मला वर उठवायचें सोडून यांनीं लाथा हाणल्या. मग......"

" सगळं थोतांड आहे. हे साक्षिदार सांगतात कीं तूं बेसुमार दारू प्याला होतास म्हणून. " पोलीसांनीं भाड्यानें आणलेल्या सभ्य वजनदार बूट-सुटां-तील साक्षिदाराकडे बोट करून न्यायाधिश गर्जले.

" हे लोक खोटं बोलतात वाटतं ? तुझा हा चेहरा, हा पोशाखच सांगतो कीं तूं दारुड्या आहेस. कदाचित् दरोडेखोरहि असशील. " श्रीधरच्या अंगाची लाही लाही होत होती. पण करणार काय ! दैवच हात धुवून मागें लागलें होतें ! " शिवाय तुझ्या बाजूचं समर्थन करणारा कांहींच सबळ पुरावा नाहीं. सबब तुला एक महिन्याची सक्त मजुरीची शिक्षा देण्यांत येत आहे. एवढ्या अवधींत आपलं अमानुष वर्तन सुधारण्याचा प्रयत्न कर. "

## पण पर्वा कुणाला ?

'माझं वर्तन अमानुष कीं तुझें ?' श्रीधरला त्याला सवाल करावासा वाटला. पण–?

श्रीधरला एका तुरुंगाच्या कोठडींत कोंबण्यांत आलें.

श्रीधरचें प्रवेशपरिक्षेपर्यंत शिक्षण झालेलें होतें. तो एका कुलशीलवान् घराण्यांत जन्माला आला होता. आज त्याचें वय जवळजवळ तेवीसच्या सुमाराचें होतें. लहानपणींच आईबाप निवर्तल्यामुळें जगांत त्याचें असें म्हणावयाला कुणींच राहिलें नव्हतें. खऱ्या प्रेमाचा ओलावा असा त्याला कधींच लाधला नाहीं. तिरस्कार, तिरस्कार, तिरस्कार, हींच अक्षरें त्याला जिकडे तिकडे दिसत. स्वार्थ आणि अहंभाव यांनींच हें जग भरलेलें आहे, अशी त्याची पूर्ण खात्री झालेली होती. यामुळें जगावर प्रेम करावयाला शिकण्यापेक्षां तो त्याचा अंतःकरणापासून द्वेष करावयाला शिकला होता. अलिकडे परमेश्वराच्या अस्तित्वाबद्दलचा त्याचा विश्वासहि डळमळूं लागला होता–नव्हे तो जवळ जवळ नास्तिक बनूं लागला होता असें म्हटलें तरीं चालेल. 'जगांत एकटाच आलों व एकटाच निघून जाणार' असें तो वारंवार म्हणे.

गेल्या वर्षाच्या आक्टोबरांत काटकसरीची कात्री त्याच्या खात्यावर फिरली व अन्नाविणें तळतळत फिरणाऱ्या शेंकडो बेकारांपैकीं तो एक झाला. दोन तीन महिने नोकरीकरितां अनेक कचेऱ्यांचीं दारें त्यानें ठोठावलीं पण कुणीहि दार उघडून आंत घ्यावयाला तयार होईना. जिथें जावें तिथें No Vacancy म्हणून पाटी लटकविलेली ! होतें नव्हतें तेवढें विकून कसेबसे त्यानें पांच सहा महिने लोटले. पुढें अन्नानिशीं जीवित कंठणें अशक्य झालें. खाणावळवाल्याचीं बिलें वाढूं लागलीं. पदोपदीं अपमान सहन करण्याचें नशिबीं आलें. दाराजवळ कुणी उभें करीना. श्रीधरची वेड्यासारखी स्थिति झाली.

वरील प्रकारच्या परिस्थितींत चौपाटीवरच्या त्या प्रसंगानें अधिकच भर घातली. 'सारंच जग कांहीं निष्ठुर नाहीं' असा जो अस्पष्ट ध्वनी त्याच्या अंतःकरणांतील एका कोपऱ्यांतून केव्हां केव्हां निघे, तोहि आतां लुप्त झाला. सत्य, स्वार्थत्याग, प्रेम, दया, औदार्य, छे, हें सगळें झूट आहे; बळी तो कान पिळी हेंच खरें, हीच भावना त्याच्या मनांत जास्त दृढमूल होत जाऊं लागली.

× × × +

" उद्यां या नरकांतून सुटून त्या दुसऱ्या नरकांत जाणार ! अहंभावाच्या दुर्गंधीनं भरलेल्या त्या नरकांत मी जाणार ! हः हः हः ! ! "

" कायरे ए बदमाश ! एवढ्या मोठ्यानं हंसायला काय झालं ? उद्यां सुटणार म्हणून हर्ष झाला वाटतं ? " पहारा करीत असलेला शिपाई त्याचें तें भेसूर हंसणें ऐकून त्याच्या आंगावर खेंकसला.

" होय बाबा. मनुष्य दरिद्री झाला म्हणजे तो बदमाशच व्हायचा ! "

" पुरे कर वटवट. हरामखोरा ! बैस, तिथं खालीं बैस. " बंदुकीचा दस्ता त्याच्या डोक्यावर मारीत शिपाईदादांनीं एखाद्या पिसाळलेल्या कुत्र्याप्रमाणें दांत विचकले.

श्रीधर निमुटपणें खालीं बसला. त्याचे डोळे विस्तवाप्रमाणें झाले होते. अंगाचा भडका उडाला होता. त्याच्या छाताडावर एक ठोसा लगवावा असें त्याला वाटलें. पण त्यानें आपल्या मनाला आंवरून धरलें. भिंतीला डोकें टेकून तो आपल्याशींच विचार करीत पडला.

" डोस्टोव्हस्की, तुझा एक एक बोल पृथ्वीच्या मोलाचा आहे असं मला आतां वाटूं लागलं आहे. चार वर्षांपूर्वी तुझी ती क्राइम ॲण्ड पनिशमेंट कादंबरी वाचतांना. त्यांत गुन्हेगाराच्या मनस्थितीचीं तूं केलेलीं वर्णनं मला अतिशयोक्तीचीं वाटत; पण आतां प्रत्यक्ष अनुभवानं तीं पटूं लागलीं आहेत. तुझीं तीं दोन चार हृदयस्पर्शी वाक्यं मला अजूनहि आठवतात. " You may be poor, and yet retain a natural pride; हो बरोबर तेंच तें, but when you are indegent, you retain nothing. An indegent man is not driven out of society with a stick, but with a broom, which is far more humiliating. Yet society is justified, for the indegent man is the first to degrade himself " समाज, समाज, हा सैतानी समाज ! वाटतं कीं याच्या नरडीचा घोट घ्यावा ! काय करूं ! " त्यानें दांत जोरानें करकरां चावले. इतक्यांत सोसाट्याचा वारा आला आणि पलिकडच्या कुठल्या तरी कोठडीचीं दारें एकमेकांवर आपटून आवाज झाला. ' धाड् धाड् ',

× × × ×

## पण पर्वा कुणाला ?

पहांट झाली. कोठडीचें दार उघडण्यांत आलें. श्रीधरला बंधमुक्त करून त्याला त्याचे जुने कपडे देण्यांत आले.

श्रीधर अवनत दृष्टीनें तुरुंगाच्या बाहेर पडला. त्यानें एकवेळ चारहि बाजूस पाहिलें. "यापुढें काय काय वाढून ठेवलं आहे कुणाला ठाऊक !" तो आपल्याशींच पुटपुटला. कांहीं वेळानें तो आपल्या बिऱ्हाडाकडे आला. वर जाण्याकरितां त्यानें जिन्याच्या पायरीवर पाऊल ठेवलें, तोंच मागून एका माणसानें त्याला खसकन् ओढलें. "ए बदमाश, वर कुठं चाललास ?"

"वा: नानासाहेब, तुम्हीं मला ओळखलं नाहीं वाटतं ?"

"डोंगरीची हवा खाऊन आलेल्या भामट्या, मी तुला पक्कं ओळखलं बरं ! हो पलिकडे. खबरदार वर पाऊल ठेवशील तर." बिचारा श्रीधर जिथल्या तिथेंच गार झाला. डोक्यावर अकस्मात वीज कडाडून पडावी त्या प्रमाणें त्याला झालें.

"उभा कशाला राहिलास ? हो चालता इथून."

"माझी खोली...."

"तुझी खोली, भामट्या तुझी खोली ! तुझ्या बापानं....."

"हं. खबरदार ! कुणाचा बाप काढतां ?"

"तुझा, तुझा. बदमाशा तुझा. चार महिन्याचं भाडं ठकवून पळणाऱ्या चोरा तुझा." त्यांनीं त्याच्या कानशिलांत जोरानें एक ठोंसा लगावला. श्रीधर आतां बेभान झाला. त्यानें तितक्याच जोरांत सक्रिय प्रत्युत्तर दिलें.

"पोलीस, पोलीस. पकडो इस बदमाशकु."

श्रीधरच्या हातांत पुन्हां एकदां बेड्या पडल्या. त्या किंबहुना कायमच्याच पडल्या, असें म्हटलें तरी चालेल. यापुढें त्यानें जाणून बुजून गुन्हे करावयाला सुरवात केली. जग जर प्रामाणिकपणानें पोट भरूं देत नाहीं, तर मग सुचेल त्या वांकड्या तिकड्या मार्गानें पोट कां भरूं नये, असें तो म्हणूं लागला. जगाचा तो आतां बेंबीच्या देंठापासून तिरस्कार करूं लागला. तुरुंग, काळें पाणी, जन्मठेप, फांसी याची त्याला आतां मुळींच भीति वाटेनाशी झाली. एका काळचा सुशिक्षित सुस्वभावी श्रीधर आज बदमाश श्रीधर म्हणून ओळखला जाऊं लागला.

या बदलेल्या स्वरूपाच्या मुळाशीं कोणतीं कारणें होतीं ? हो, पण तीं समजून घेण्याची तुम्हांला कुठें पर्वा आहे ?

# स्त्रीजीवन

तिन्ही सांजची वेळ. बाळ झोंपीं जात होतें. आई त्याला आपल्या मांडीवर घेऊन थोपटीत होती. त्याला केव्हांच झोंप लागली होती, तरी पण ही आपली त्याला थोपटीतच होती. तिचें चित्त कुठें तरी व्यग्र झालें होतें. निश्चल पण शून्य अशा दृष्टीनें ती खिडकीवाटे पहात होती.

तिनें एक दीर्घ निश्वास सोडला. दृष्टि खालीं वळविली. बाळ स्वस्थ झोंपी गेलें होतें. तिनें परत एक निश्वास सोडला. तिला आपल्या सुखकर शैशव-कालाची आठवण झाली कीं काय कोण जाणे ! तिच्या डोळ्यांतून ओघळलेले दोन अश्रुबिंदु बाळाच्या गालावर घळकन् पडले.

" आतां यापुढचं सारं आयुष्य हें असंच जायचं. आंत वणवा जरी पेटत असला तरी बाहेरून आनंदी आनंदच आहे असं दाखवायचं, हो दाखवलंच पाहिजे. आंतल्या जखमा कुणाला दाखवावयाच्या ? दुसऱ्यांना दिसणार तरी त्या कशा ? बरं, दिसल्या तरी त्यांना कोण कसलं मलम लावणार ? लावतील, सहानुभूतिचं मलम लावतील. पण तें मलम कसलं ? मीठ, मीठ ! जखमेचा दाह त्या योगं अधिक होईल ! प्रेमाचं मलम, विशुद्ध प्रेमाचं मलम, हे ! पण तें माझ्या नशिबीं कुठं आहे ? कुठं आहे ? "

तिच्या विचारांचा प्रवाह इथेंच थांबला. तिचें मन एकाच प्रश्नाची आतां सारखी घोषणा करूं लागलें. " हें विशुद्ध प्रेम कुठं आहे ? कुठं आहे ? "

पद्मा म्हणजे एक शापभ्रष्ट देवता होती. कोण्या जन्मीं कुणाचा तिच्या हातून अज्ञानानें काय अपराध घडला होता कुणाला ठाऊक ! तिला या जन्मीं

असह्नीय असें प्रायश्चित त्याबद्दल भोगावें लागत होतें. तिच्यासारखी रूपानें, गुणानें, बुद्धीनें, विनयानें संपन्न असलेली तरुणी शंभरांत एखादीच सांपडली असती. तिच्यासारखी पत्नी लाधणें हा एखाद्या गुणी तरुणानें एक प्रकारचा परमेश्वरी प्रसादच मानला असता. अत्यंत भक्तिभावानें त्यानें तो प्रसाद आपल्या शिरावर धारण केला असता; आपलें जीवन कृतार्थ झालें असें त्यानें मानलें असतें. साऱ्या तीर्थांनीं आपल्या पत्नीच्या रूपानें आपल्याकडे येऊन आपलें घर पावन केलें आहे, असें त्यानें मानलें असतें. आपल्या पत्नीच्या मुखावर सदा झळकत असलेल्या मधुर स्मितानें प्रकाशित झालेलें आपलें घर पाहून, ' याहुनी स्वर्ग दुजा कोणता ' असे त्यानें वारंवार उद्गार काढले असते. पण ज्याचें जें इप्सित तें त्याला जर मिळत गेलें असतें तर, ' जगांत मुळीं परमेश्वरच नाहीं. ती एक भ्रमिष्ट डोक्यांतून निघालेली कल्पना आहे; आणि परमेश्वर असलाच तर तो अत्यंत निष्टुर असला पाहिजे ', असे निराशेचे बोल जिवाच्या तोंडून कदापि निघाले नसते. जग हें आनंदमय आहे, प्रतिस्वर्ग आहे असें त्याला वाटलें असतें. पण ही विषमता, जगांत पदोपदीं आढळून येणारी ही विषमता त्याच्या हृदयांत तिरस्काराचा अग्नी प्रत्यहीं प्रज्वलीत करीत असतां ईश्वराचें दयालुत्व किंवा अस्तित्व त्याला कसें पटणार ? पद्मेचीहि अशीच स्थिति झाली होती. जगांत परमेश्वर आहे, त्याची सर्वांवर समदृष्टि असते, अखिल विश्वाचा तो पिता आहे या गोष्टींवरील तिचा विश्वास अलीकडे अलीकडे उडून जाऊं लागला होता. " परमेश्वर दयाळु आहे म्हणतात मग कांहीं अपराध नसतां या यातना कां ? " तिचें एक मन म्हणे. पण तत्क्षणींच दुसरें मन जागृत होऊन म्हणे, " पूर्वजन्मीं तुझ्या हातून अपराध घडले असतील ! " " हात् रे वेड्या ! पूर्वजन्म ! ज्याची स्मृतीसुद्धां नाहीं, जो केवळ वेड्या वेदान्त्यांच्या शुष्क चोपड्यांत फक्त अक्षराच्या रूपानं आढळतो, त्याच्याकडे कसलं बोट दाखवतोस ! पूर्वजन्म, पूर्वजन्म ! खुळ्या माणसांनीं त्यावर विश्वास ठेवून पाहिजे तर समाधान मानून घ्यावं, " परत पहिलें मन दुसऱ्याला म्हणूं लागे.

सुखाच्या परमावधीनंतर जेव्हां दुःखांची परंपरा कांहीं कारण नसतां एकाद्यावर कोसळते, त्यावेळीं त्याचे विचार वरील प्रकारचे बनूं लागतात.

पद्माच मग या गोष्टीला अपवाद कशी ठरेल ! जिचें विवाहपूर्व जीवन एखाद्या फुलपांखराप्रमाणें स्वच्छंदानें नाचण्या बागडण्यांत, हंसण्या खेळण्यांत, दुसऱ्यांवर शुद्ध भावानें प्रेम करण्यांत व दुसऱ्यांचें आपल्यावर करून घेण्यांत गेलेलें, तिला हें प्रेमशून्य विवाहोत्तर जिवन कंठणें सहारा वाळवंटांतील प्रवासाप्रमाणें वाटावें यांत आश्चर्य तें कसलें ? नालिनी भाण्डारे म्हणून तिची एक जिवाभावाची मैत्रिण होती. या मैत्रिणीबरोबर सायंकाळीं समुद्राच्या किनाऱ्यावर लाटांची मौज पहात किंवा त्यांच्या नादलहरींत आपल्या गाण्याच्या लकेरी मिसळीत इतस्ततः हिंडण्यांत, तिनें दिवसचे दिवस घालविलेले. नलिनी भांडारे ही एक काव्यात्म मुलगी होती. तिचें सारेंच कांहीं विलक्षण होतें. नवीं नवीं मनोराज्यें रचून तीं आपल्या मैत्रिणांना काव्यपूर्ण भाषेंत सांगण्यांत तिचा हातखंडा असे. नलिनीच्या सान्निध्यामुळें पद्मेनेंहि आपल्या भावी आयुष्यासंबंधींच्या कांहीं रम्य योजना मनांत तयार करून ठेविल्या होत्या. हिंदु कुमारिकांचें भवितव्य त्यांच्या हातीं नसतें, ही गोष्ट ती सर्वस्वी विसरली होती. मॅट्रिकची परीक्षा झाल्यावर ध्यानीं मनीं नसतां घरांत लग्नाच्या वाटाघाटी सुरू झाल्या. आपल्या मैत्रिणीकडून नानांचें व माईचें—वडिलांचें व आईचें—मन वळविण्याचा तिनें प्रयत्न केला. पण व्यर्थ ! त्यांनीं ठरविल्याप्रमाणें लग्न घडून आलें. पोलीस खात्यांतील एका तरुण अधिकाऱ्याशीं तिची जन्माची गांठ घालून देण्यांत आली. माई फार आयास न पडतां सुंदर जांवई मिळाला म्हणून आनंदित झाल्या, तर नाना पैसेवाला व मानमरातबवाला वर मिळाल्यामुळें आपण धन्य झालों असें समजत होते. खुद्द पद्मेच्या हृदयांत काय खळबळ चालली होती याची वास्तपुस्त कोण घेतो ? कांहीं झालें तरी ती हिंदु कुमारिका. तिला ईश्वरानें मन आणि वाचाच—निदान समाजाला तरी असें वाटतें- मुळीं दिलेलीं नाहींत !

लग्नानंतर दोन चार महिन्यांनीं तिची आणि तिच्या पतीची विधिपूर्वक भेट झाली. ही भेट कित्येकांच्या आयुष्यांत—विशेषतः सुशिक्षित तरुणींच्या—कित्येकदां क्रांतीला कारण होत असते. आजपर्यंत विणलेल्या मनोरथांचा पट कायमचा टिकणार किंवा त्याचा धागानूधागा तुटला जाणार याचें भविष्य ह्याच पहिला क्षण ठरवीत असतो. पद्मेला या पहिल्या भेटींत आपल्या नाशिबीं

पुढें काय लिहून ठेविलें आहे तें कळून आलेंच आणि त्याबरोबरच—हो पण त्याचा उल्लेख इथें कशाला ?

" नाना माई जर हट्टाला पेटल्या नसत्या. मी काय म्हणतें याचा जर त्यांनीं विचार केला असता तर तोंड बांधून बुक्कयांचा मार खाण्याचें माझ्या नशिबीं आलं असतं का ? मघांच्या ' पण तें प्रेमाचं मलम कुठं आहे ? कुठं आहे ? " या प्रश्नाची घोषणा थांबून पुनः तिच्या मनांत विचारांची परंपरा सुरू झाली होती. " लहानपणीं मी काय काय मनोराज्यं रचिलीं होतीं ! पण......हूंऽऽ माझ्या हृदयांत विराजमान झालेली त्यांची मूर्ति...होय... प्रभाकर...हूंऽऽ त्यांच्या बरोबर जर आज......छे, माझं मन काय बरं भडकत चाललं हें ! ज्याकडे, बळजबरीनं का होईना, कायमची पाठ फिरवली त्याची आज स्मृति कशाला ? मनानं त्या काळाचं चिंतन करणं हें सतिधर्मा-विरुद्ध आहे. अग्नीब्राह्मणासमक्ष ज्यांच्याशीं जन्माची गांठ बांधून घेतली, त्यांचंच चिंतन प्रतिक्षण माझ्याकडून झालं पाहिजे. झालं पाहिजे असं कां बरं म्हणतें आहें मी ? होतं आहे. आज चार वर्षं रात्रंदिवस सारखं होतं आहे. त्यांच्या कल्याणाचीच चिंता आतांपर्यंत नाहीं का मी वहात आलें ? माझं सर्वस्व मी त्यांनां देण्याचा प्रयत्न केला, पण त्यांनीं त्याचा अव्हेर केला. त्यांचं प्रेम माझ्या शरीरावर, या क्षणभंगुर शरिराच्या सौंदर्यावर ! स्. काय ती त्यांची दृष्टि ! जणुं काय एखादं क्रूर जनावरच आपल्या भक्ष्यावर हल्ला करतं आहे ! त्यांच्या त्या डोळयांतून जणूं काय आगीचे लोळ वहाताहेत असं वाटतं. स्. या विचारांबरोबर माझ्या शरीरावर कसे कांटे उभे राहूं लागले आहेत ! संसारांत स्त्रीची, एक भोगवस्तु याहून अधिक किंमत नसावी ना ! काय हें जिणं ! स्त्रियांच्या जन्माला येणं यासारखं दुसरं पाप नाहीं. होय, खरोखरच याच्यासारखं दुसरं पाप नाहीं. नाथ, अजून तरी ती वृत्ति सोडा. देवकोटींत जाऊं इच्छिणाऱ्या माणसांनां ही पशुवृत्ति शोभत नाहीं. शरीरावर आसक्ति कसली ! आत्मा प्रेममय बनूं द्या. वैषयिक प्रेमानं नव्हे बरं ! माणसाला देवकोटीला पोंचविणारें सात्त्विक प्रेम, तुमच्या माझ्या हृदयांत जागृत होऊं द्या. त्याची आपण सतत जोपासना करूं या. खरंच गडे, आपलं जीवन किती सुंदर होईल ? खरंच, खरंच होईल. हो, पण मी

हे उत्तुंग मनोरे कशाला बरं रचतें आहें ? कांहीं, कांहीं म्हटल्या त्याचा उपयोग होणार नाहीं. तडकलेली कांच पुनः कशी जडली जाणार ? आतां या यातनांतून मुक्तता करून घेण्याचा एकच मार्ग. होय, होय. तोच तोच. माझे कायमचे डोळे मिटले तर कुणाचं काय नुकसान होणार आहे ? उलट बरंच वाटेल. त्यांचा मार्ग मोकळा होईल. होय,पण मी काय हे भयंकर विचार चालविले आहेत ! मी जर गेलें तर माझं बाळ ! " 'माझं बाळ' हे शब्द डोळ्यांसमोर उभे रहातांच तिचें हृदय खळबळलें. तिच्या डोळ्यांतून अश्रुधारा वाहूं लागल्या. "छे ग बाई. माझ्या या माणकाला एकटं टाकून जगाचा निरोप ! छे, कालत्रयींहि मी घेणार नाहीं. हुं हुं माझं सोनुलें तें, माझं छकुलं तें ! असंच असंच मी त्याला माझ्या हृदयाशीं कायमचं धरून ठेवीन. तिनें त्याचे मटामट मुके घ्यावयाला सुरुवात केली. बाळ झोपेंतून दचकलें. " पद्मे ! " म्हणून बाहेरून हांक मारली गेली.

तिची तंद्री खाडकन् उतरली. तिनें दाराकडे कान टवकारले. ' भास तर नाहीं हा ?"

"पद्मे !" हांकेबरोबरच दार खडखडावलें गेलें. तिनें बाळाला नीट बिछान्यावर थोपटून झोंपवलें, त्याच्या अंगावर पांघरूण घातलें व ती लगबगीनें दाराकडे गेली.

आज चार दिवसांनीं पतिराजांचें घरीं येणें होत होतें.

त्यांनीं अंगावरचा सूट उतरला व जवळच्या खुर्चीवर फेंकून दिला. मोरीजवळ जाऊन हातपाय धुतले व तिनें मांडलेल्या पाटावर जाऊन ते बसले.

खालीं मान घालून त्यांचें जेवण चाललें होतें. ती भिंतीला टेंकून उभी राहिली होती. कोणी कोणाशीं एकहि शब्द बोललें नाहीं. ताटांतला पदार्थ संपला म्हणजे पुन्हां वाढावयाचा ! एखाद्या यंत्राप्रमाणें ती वागत होती.

आंचवणें झाल्यावर रुमालाला हात पुशीत असतां त्यांनीं विचारलें: " आज प्रकृति कशी आहे ? "

"आहे तशीच आहे. " खालच्या मानेनं तिनें उत्तर दिलें.

"तुझी प्रकृति केव्हांच बरी व्हायची नाहीं !" रोष व तिरस्कारमिश्रित नजरेनें तिच्याकडे पहात ते निजण्याच्या खोलींत निघून गेले.

ती ताटावर बसली पण तिला जेवणच जाईना. दोन घांस कसेबसे तिनें घशाखालीं ढकलले; खरकटीं भांडीं एका बाजुला नेऊन ठेवलीं, हात धुतले, सामानाची झांकपाक केली व ती निजावयाच्या खोलींत गेली. बाळाला त्यानीं बिछान्यावरून खालीं चटईवर एक रजई अंथरून झोंपविलें होतें. त्याच्या शेजारींच ती जाऊन पडली.

झोंप यावी म्हणून तिनें डोळे मिटले, पण विचार तिला झोंप कुठली येऊं द्यायला ? तिची सारखी चुळबुळ चालली होती. ते मात्र पलंगावर स्वस्थपणें तालसुरावर घोरूं लागले होते.

त्यांचें तें घोरणें पद्मेला असह्य झालें. खोलीचें दार उघडून ती बाहेर सज्ज्यांत येऊन बसली. आभाळांत चंद्र पूर्णतेजानें प्रकाशत होता. झुळझुळ वाहणाऱ्या वायूच्या आंदोलनानें सळसळणाऱ्या झाडांच्या पर्णांतून त्याचे रुपेरी किरण थयथय नाचत होते. सारी सृष्टि गूढ अशा निःस्तब्धेंत विलीन झाली होती.

तिनें एक दीर्घ निःश्वास टाकला. आणि ते पहा तिचे ओंठ कांहीं तरी पुटपुटत आहेत. " पुरुषांना हृदयच नसतं का ?" हो हेंच तें वाक्य ! हेंच वाक्य ती सारखी पुटपुटत आहे. आणि हें काय ? ही अश्रूंची झरणी कां सुरू झाली ? पण पुरुषांना तें समजून घेण्याची काय जरुरी ?

# शोफरचा शेट

अगदीं हलक्या पावलांनीं तो जिन्याच्या पायऱ्या चढत होता. चढण्याच्या श्रमानें होणारें द्रुतश्वसनहि कोणाला ऐकूं जाऊं नये अशी त्याची इच्छा असावी, असें त्याच्या चेहऱ्यावरून दिसत होतें.

" हं, हीच ती खोली. आर. एम्. आठवले. " खोलीच्या दारावरील पाटी पहात तो पुटपुटला.

खोलीचें दार बंद होतें. त्यानें नीट कानोसा घेतला व आजूबाजूच्या खोल्यां-कडे एकवार पाहिलें. साऱ्यांचींच दारें बंद होतीं. दोनप्रहरची वेळ, त्यांतून रविवार. जो तो यावेळीं सुखनिद्रेंत असावयाचा.

जिन्याच्या कठड्याला टेंकून तो कांहीं वेळ उभा राहिला. " आयुष्यभर माझ्या भाग्याचीं प्रवेशद्वारें अशींच बंद राहाणार काय? राहतीलहि. आपण दारिद्र्यांतच जन्मलों आणि दारिद्र्यांतच मरणार! भावि सुखाच्या आशेनें भिक्षा मागून शिक्षण संपादलें, पण तसें केल्याबद्दल आतां पस्तावा करण्याची पाळी आलेली आहे. आशेमुळेंच निराशेचे चटके असहनीय होतात, जीवन दुःखमय होतें. त्या वेळींच उद्योगधंद्याला लागलों असतों, तर आज चार पैसे संग्रहीं पडले असते; पण सामाजिक दर्जा! सामाजिक दर्जा! हुं ऽ ऽ." त्याच्या निराश हृदयांत विचारांची सारखी परंपरा सुरू झाली होती.

" दार ठोठावूं का ? नको. गृहस्थ कोणत्या प्रकृतीचे असतील कुणाला ठाऊक. एकदम गरम झाले तर ! साराच नाश. त्यापेक्षां इथेंच उभें राहावं झालं. "

जवळ जवळ तास दीड तास तो तेथेंच ताटकळत उभा होता. शेवटीं ' काय होईल तें होवो ' असें मनाशीं ठरवून तो दाराजवळ आला. टिचकी मारण्यापूर्वीं पुनः एकदा त्यानें कानोसा घेतला. आंत आतां हालचाल सुरू झाली होती.

" खट् खट् खट्. "

" कोण आहे ? " कोमल स्वरांत आंतून विचारण्यांत आलें.

कंकणाच्या रुणुझुणु आवाजांत कडी काढण्यांत आली. त्याची छाती धडधडूं लागली. 'आंतलि बाईसाहेब शांतीचा भंग केल्याबद्दल तोफेचा भडिमार नाहीं ना करणार ? कुठली दुर्बुद्धि मला झाली ही ! ' तो खालीं मान घालून एका बाजूला झाला. वाघिणीच्या गुहेच्या तोंडाशीं उभ्या केलेल्या माणसाप्रमाणें त्याची स्थिति झाली.

" आपणाला कोण पाहिजे ?"

" रावसाहेबांची गांठ घ्यायची आहे." तो म्हणाला. त्यानें मान वर करून पाहिलें तों ती एक षोडशवर्षा सुंदर कुमारी होती.

" बाबा कांहीं कागदपत्र पाहात बसले आहेत. इतक्यांत बाहेर येतलि. आपण आंत येऊन बसा." ग्रीष्मऋतूंतील तापदायी उन्हानें कोळपून गेलेल्या शरीराला सायंकालीन दक्षिण वायूच्या मंदमंद झुळुकांचा स्पर्श होतांच जीवाला ज्या प्रकारची शांति वाटते त्या प्रकारची अननुभूत अशी शांति राजारामाला वाटूं लागली. तो आपलें दारिद्र्य आणि भोंवतालची प्रतिकूल परिस्थिति क्षणभर विसरला. तिचे शब्द साधेच होते, पण त्यांत एक प्रकारची प्रसन्नता भरलेली होती.

खोली फार मोठी नव्हती, परंतु तेवढ्यांतल्या तेवढ्यांत किती तरी वस्तु ठेविलेल्या होत्या. चारहि कोपऱ्यांत मोठमोठीं कपाटें असून, त्यांत विविध विषयांवरील पुस्तकें व्यवस्थितपणें ठेविलेलीं होतीं. भिंतीवर मिल्, स्पेन्सर, कॉब्डेन, ग्लॅडस्टन, नेपोलियन, शिवाजी, वॉशिंग्टन, रानडे, गोखले, टिळक,

आगरकर, ख्रिस्त, बुद्ध, ज्ञानदेव, तुकाराम यांच्या तसबिरी झळकत होत्या. खोलीच्या मध्यभागीं लेखनसाहित्यानें परिपूर्ण असें एक सुंदर चकचकीत टेबल ठेवलेलें होतें.

राजाराम एका बाजूच्या साध्या खुर्चीवर खोलीचें निरीक्षण करीत बसला. ‘ माणसाचा बाह्य परिवेश त्याच्या अगोचर हृदयाची गोचर प्रतिकृति असतो असें म्हणतात तें जर खरें असेल, तर हे गृहस्थ अत्यंत उदारमतवादी असावेत. आणि ते तसे असतील तर–तर. नकोच ती आशा. आजवर जो अनुभव आला तोच येईल. उगाच मनोराज्य करण्यांत काय अर्थ आहे ?’ त्याच्या कांहीशा प्रफुल्लित झालेल्या चेहऱ्यावर पुनः निराशा पसरूं लागली. त्यानें एक दीर्घ निःश्वास टाकला. डोळयाच्या एका कोनांत एक अश्रु चमकला. इतक्यांत कोणाच्या तरी पावलांचा ध्वनि ऐकूं आला. त्यानें आपल्या फाटक्या धोतरानें डोळयाच्या बाहेर टिपकण्याच्या बेतांत असलेला अश्रु पुसला व पोशाख नीट चापचोप करून अदबीनें उभा राहिला.

सुमारें पन्नास पंचावन्न वर्षें वयाची एक व्यक्ती खोलींत आली. राजारामानें झटकन तिला अत्यंत विनयपूर्वक नमस्कार केला.

“ बसा, बसा. आपण कुठून आलांत ? माझ्याकडे कांहीं काम आहे वाटतं ? ”

“ होय. ” अर्धस्फुट आवाजांत राजाराम उतरला.

“ काय काम ? ”

“ आपल्या कचेरींत मला एखादी नोकरी मिळूं शकेल काय ? ”

रावसाहेबांनीं त्याला एकदा नखशिखांत न्याहाळलें. त्याच्या चेहऱ्यावर कर्तबगारीचें तेज झळकत होतें. त्याचा विशाल भालप्रदेश त्याच्या बुद्धिमत्तेची साक्ष देत होता. ‘ मग ही अशी स्थिति कां ? ’ ते मनाशींच उद्गारले. त्याचें तें फाटकें धोतर, तो मळलेला व ठिगळें लाविलेला कोट, व त्याच्या चेहऱ्यावरील कींव उत्पन्न करणारी निराशा हीं पाहून त्यांचा जीव हलला.

“ आपलं शिक्षण कुठपर्यंत झालें आहे ? ” रावसाहेबांनीं आस्थापूर्वक पृच्छा केली.

“ गेल्या वर्षी दुसऱ्या वर्गांत बी. ए. ची परीक्षा पास झालों. ”

## शोफरचा शेट

" काय म्हणतां ? तुम्हीं पदवीधर आहांत ! "

" होय. "

" मग अशी स्थिति कां ? "

" सध्यांची वाढती बेकारी. गेले सहा महिने नोकरीसाठीं सारखा वणवण फिरत आहें. पण कुठेंच काम मिळत नाहीं. जिव अगदीं वैतागून गेला आहे. परवां माझ्या एका स्नेह्याकडून मी आपलें नांव ऐकल्यामुळें आपणाकडे आलों आहें. आपण तरी मला कांहीं मार्ग दाखवा. कुठेंतरी खर्च भागविण्यापुरती नोकरी मिळाली, तर एल्एल्बीच्या टर्म्स् भरीन म्हणतों. "

" एल्एल्. बी ! वेडे आहांत तुम्हीं. वकिलांची सध्यां काय स्थिति आहे याची तुम्हांला कांहीं कल्पना आलेली दिसत नाहीं. कुटुंबाच्या पोषणाकरितां आडवेळीं मास्तरकी किंवा कारकुनी करावी लागते. महिन्याकांठीं टांग्याचें भाडें भागविण्याएवढी सुद्धां मिळकत होण्याची पंचाईत. तुम्हां तरुणांना खरी दृष्टि केव्हां येणार कुणाला ठाऊक. तुम्ही शहाणे असाल तर या धंद्यांत पडूं नका. "

" मग काय करूं ? अन्य मार्गच मला दिसत नाहींसा झाला आहे. "

" मी सांगतों तसें कराल ? "

" हो. "

" तुम्ही पुस्तकी शिक्षणाहून अन्य शिक्षण घ्यायला तयार आहांत ? "

" पैशाची प्राप्ति करून देणारें कोणतेंहि शिक्षण घ्यायला मी तयार आहें."

" सुशिक्षितपणाचा खोटा अभिमान सोडावा लागेल. निरक्षर हमालाप्रमाणें काम करावें लागेल. पटेल का तुम्हांला ?"

" मी करीन. दैवदयेनें माझें शरीर सुदृढ आहे. मी कोणतेंहि काम करायला मागें घेणार नाही."

"आमच्या शेजारींच धनजी रुखजीची मोटार कंपनी आहे. त्यानें एक मोटार ड्रायव्हिंगचा वर्ग काढला आहे. जात जा तुम्हीं तिथें. फीची मी व्यवस्था करतों. चांगलं शिक्षण संपादलंत, बुद्धीचा उपयोग केलात, तर भाग्योदय व्हायला वेळ लागणार नाहीं. घरीं तुमचीं कोण कोण माणसं आहेत?"

" कुणी नाहीं. मी एकटाच आहें. माझी एक वडील बहिण आहे; पण ती आपल्या घरीं असते."

" अस्सं. मग तुमचं शिक्षण कसं काय झालं ?"

" वार, शिकवण्या व शिष्यवृत्त्या यांवर कसं तरी केलं. "

" हं " ते आरामखुर्चीवर ऐसपैस पाय मोडून डोळे मिटून पडले. "याला आपल्या घरीं आश्रय द्यावा का ? बिचारा बुद्धिवान असून परिस्थितीमुळें दारिद्र्यांत कुजतो आहे. इथं राहिला तर आपलंहि शिक्षण चालवील आणि शकूच्याहि अभ्यासांत मदत करील. राहूं द्या बिचाऱ्याला आपल्याकडेच."

" हें पाहा, आपण आमच्याचकडे उद्यांपासून राहायला या. तुम्ही बी. ए. ला कोणते विषय घेतले होते ?"

" इंग्रजी आणि संस्कृत. "

" ठीक. मग असं करा, आमच्या शकुंतलेला सकाळीं एक तास आणि संध्याकाळीं एक तास अभ्यासांत थोडी मदत करीत जा. जुळेल का आपल्याला ?"

" हो. न जुळायला काय झालं ? मी हें काम आनंदानं करीन."

" बरं आहे तर मग. जा तुम्हीं आतां आणि उद्यां सामानसुमानासह इकडेच राहायला या."

राजारामाचे डोळे कृतज्ञतेच्या अश्रूंनीं भरून गेले. त्यानें त्यांच्या पायांवर डोकें ठेविलें.

" हें काय, हें काय ? असें कांहीं करूं नका. जा आतां."

रावसाहेब आठवले कमिशनरच्या ऑफिसमध्यें एका बड्या जागेवर होते. एक सुस्वभावी व उदारहृदयी गृहस्थ म्हणून त्यांचा लौकिक होता. कोणी त्यांच्याकडे कांहीं मागावयाला आलें आणि तें त्याला मिळालें नाहीं असें कधींच झालें नाहीं. शक्त्यनुसार जेवढी मदत करतां येईल तेवढी ते त्याला करीत. त्यांना निरनिराळ्या विषयांवरील पुस्तकांच्या वाचनाची फार आवड असे. विशेषतः इतिहास आणि समाजशास्त्र या विषयांचे तर ते एकांतिक विद्यार्थी होते. या विषयांवरील उत्तमोत्तम ग्रंथांचा त्यांच्याकडे फारच चांगला संग्रह होता. आपल्याप्रमाणेंच आपली कन्याहि व्यासंग-

प्रिय व्हावी अशी त्यांची फार इच्छा होती. राजारामाला घरीं ठेवून घेण्यांत त्यांचा हाच हेतू होता. त्याच्यासारख्या कष्टाळू आणि बुद्धिमान् माणसाचा तिष्याकडून आस्थापूर्वक अभ्यास करवून घेण्यांत बराच उपयोग होईल असें त्यांना वाटत होतें.

राजाराम ठरल्याप्रमाणें दुसऱ्या दिवशीं रावसाहेब आठवल्यांकडे राहावयास आला, धनजी रुखजीच्या कंपनींत त्यानें विद्यार्थी म्हणून नांव दाखल केलें. त्याच्या नव्या आयुष्यक्रमाला सुरवात झाली.

राजारामाचा स्वभाव अत्यंत मनमिळाऊ होता. आपल्याबरोबरच आपल्या सभोंवतालच्या माणसांचीं मनें प्रसन्न राखण्याची कला त्याला उत्तम प्रकारें साधली होती. यामुळें घरांतील सारीं माणसें त्याच्यावर लोभ करीत. शकूचें तर...होय, पण त्याची परिस्फुटता उगाच इथें कशाला ?

सहा महिने हां हां म्हणतां केव्हांच निघून गेले. राजारामाचा अभ्यासक्रम पुरा झाला. स्वतःच्या हिमतीवर आपण कांहीं तरी करूं शकूं, अशी धमक त्याला आतां वाटूं लागली.

“ राजाराम ! ” एक दिवस रावसाहेब त्याला हांक मारून म्हणाले, “ मुंबईच्या शेअरमार्केटमधील वालचंद प्रेमचंदचें नांव ऐकलं आहे आपण ?”

“ ते, दलाल ना ? ”

“ हो. ”

“ होय, ऐकलं आहे. ”

“ त्यांना एक चांगला शोफर पाहिजे आहे. आपण रहाल का त्यांच्याकडे ? महिना पाऊणशें रुपये देतील. एक मात्र करायचें, तुमचं कांहीं इंग्रजी शिक्षण झालें आहे याची वार्तासुद्धां त्यांना लागूं द्यायची नाहीं. असं बजावण्यांत माझा एक विवक्षित हेतू असून तो तुमच्या कल्याणाचाच आहे. अगदीं तसाच प्रसंग आला तरच त्या गोष्टीची परिस्फुटता करा. कळलं ? मग आहांत तिकडे जायला तयार ? ”

"मी आपल्या आज्ञेबाहेर नाहीं." राजारामानें विनयपूर्वक उत्तर दिलें. पण त्याबरोबरच एका विचारानें मात्र त्याचें हृदय व्यथित झालें. "शकूच्या प्रेमळ दर्शनाला आपण आतां मुकणार. आपण बाहेरून दमून भागून आल्यावर 'राजाराम, किती दमून गेलांत हे! फराळाचं आणूं का थोडसं? घ्याना. भूक लागली असेल नाहीं यावेळीं? माझ्याकरतां थोडसं. असं नये करूं माणसांनीं. आणतेंच आतां' असं जिव्हाळयानं कोण बरं म्हणेल!" शकूची प्रेमळ मूर्ति त्याच्या डोळयांपुढें उभी राहिली. 'रावसाहेब, मला एवढ्या पगाराची नोकरी न मिळाली तरी चालेल, परंतु आपणा सर्वांपासून मला दूर लोटूं नका' असें त्याला एकदा म्हणावेंसें वाटलें. शब्द ओठाशीं आलेहि. पण तेवढ्यांतल्या तेवढ्यांत त्यानें मनाला आंवरून धरलें. 'झाले हे उपकारच अनंत आहेत. अधिकाची आशा केल्यानें भलतेंच कांहीं तर व्हायचें.' तो मनाशीं म्हणला.

मुंबईला जाण्याचा दिवस उजाडला. अत्यंत कष्टानें त्यानें प्रत्येकाचा निरोप घेतला. विशेषतः माई, रावसाहेब व शकुंतला यांचा निरोप घेतांना तर त्याचा कंठ अगदीं दाटून आला, त्याचे डोळे डबडबून गेले. 'येतों' हा दोन अक्षरी शब्दसुद्धां त्याच्या तोंडांतून नीट बाहेर पडेना.

"नीट, जपून वागा हं." तो टांग्यांत बसत असतां माई वात्सल्य-पूर्वक म्हणाल्या.

"नियमित पत्र पाठवित जा. दूर जात असलांत तरी तुम्हीं आमचेच आहांत हें विसरूं नका." रावसाहेब म्हणाले.

टांगा चालू झाला. माई, रावसाहेब माडीवर गेलीं. शकुंतलेला मात्र जाग्यावरून हालवेना. टांगा दृष्टीआड होईपर्यंत ती सारखी त्याच्याकडे अनि-मेष नेत्रांनीं पाहात होती.

आणखी एक वर्ष लोटलें. पूर्वींचा निराश वृत्तीचा राजाराम आतां तसा राहिला नव्हता. व्यापारी जगाशीं नित्य संबंध आल्यामुळें त्याच्यांत व्यवहार-नैपुण्य बरेंच आलें होतें. पहिल्या पहिल्यांदा 'शोफर' असें कोणी म्हटलें तर

त्याला कसेंसेंच होई. पंधरा रुपयांची कारकुनी पत्करली, परंतु ही नीच दर्जाची सेवकवृत्ति नको, असें त्याला वाटे. या वेळीं त्यानें शकूला, 'आपण अगदीं कंटाळलों आहोंत. नोकरी सोडून कुठेंतरी जावें असें वाटतें.' असें अगदीं त्रासून लिहिलें होतें. परंतु शकूनें आपल्या गोड शब्दांच्या योगें त्याला धीर दिला. 'आज ना उद्यां बरे दिवस आल्याशिवाय राहावयाचे नाहींत. आपण असे निराश होऊं नका, सध्यां आहांत त्या परिस्थितीचा फायदा करून घ्या, आम्ही सारींजणें आपलींच आहोंत. चित्त चंचल होऊं देऊं नये.' अशा तऱ्हेचा मजकूर ती वारंवार लिही. हळूहळू या पत्रांच्या योगें असो किंवा अन्य कांहीं कारणांमुळें असो, त्याचे विचार पालटूं लागले. कसल्यातरी निराळ्याच विचारांत तो सदा गुंग असे. त्या विचारांच्या योगें आपण केव्हांना केव्हां तरी समाजांत वरिष्ठ दर्जा प्राप्त करून घेऊंच घेऊं असें त्याला वाटे.

वालचंद प्रेमचंदांचा सारा व्यवहार शेअर बाजारांत असे, त्यांच्या सहवासांत सारा दिवस राहिल्यामुळें तेथील व्यापाराच्या घडामोडींचें बारीक निरीक्षण करण्यास त्याला वाव मिळाला. मूळचीच तरल बुद्धि असल्यामुळें शेअर बाजरांतील घडामोडींतील खुब्या आत्मसात करण्यास त्याला फारसा वेळ लागला नाहीं. आपल्या शोफरची एका बाजूला शांतपणें एवढी तयारी चालली असेल याची वास्तपुस्त सुद्धां शेटजींना नव्हती. 'निरक्षर असूनहि बरा आहे चलाख,' असें, 'कसा काय आहे तुमचा नवा शोफर ?' म्हणून कोणी विचारलें असतां ते म्हणत.

* * * * *

शेअर्सच्या भावांत कांहींतरी घोटाळा झाल्यामुळें शेटजी आज चिंताग्रस्त झाले होते. असें कां व्हावें हेंच त्यांना कळेना. किती तरी वेळ ते विचार करीत होते. शेवटीं कोणाशीं तरी त्याबद्दलची एकदाची चर्चा करून कारण शोधून काढल्याशिवाय गत्यंतर नाहीं असें ठरवून, त्यांनीं आपल्या एका तज्ज्ञ अशा जिवश्चकंठश्च दोस्तास बोलावणें पाठविलें. तो येतांच राजारामाला वाळकेश्वरवरील बंगल्याकडे जावयाचें असें सांगून दोघेही आंत बसले. चर्चेला जोराजोरानें सुरवात झाली. पण कोणालाच तो घोटाळा उलगडेना. राजाराम त्यांचें सारें बोलणें अवधानपूर्वक ऐकत होता. डोळे वाळकेश्वरच्या दिशेकडे

होते; परंतु त्याचें सारें चित्त शेटजींच्या बोलण्याकडे लागलें होतें. सारा प्रकार त्याच्या पूर्णपणें लक्षांत आला आणि चर्चा ऐकण्याच्या भरांत तो खरी चूक बोलून गेलाहि.

दोघेहि शेटजी थक्क झाले. 'तुला एवढं कसं कळलं? धंद्यांत काळयाचे पांढरे केंस झालेल्या आमच्या डोक्यांना जी गोष्ट उमगूं शकली नाहीं ती तुझ्यासारख्याला उमगावी! छे! कदापि शक्य नाहीं. तूं आमच्या प्रतिस्पर्ध्या-कडचा कोणीतरी लुच्चा हेर असला पाहिजेस. साध्या भोळया रावसाहेब आठवल्यांना चकवून तूं त्यांच्याकडून शिफारसपत्र मिळविलं असावंस. खरें बोल. नाहीं तर देतों पहा पोलीसच्या ताब्यांत. बदमाश!" शेटजींनीं मध्येंच मोटार थांबविली आणि त्याच्या मानगुटीला हात घातला. "माफ करा, शेटसाहेब. आपण म्हणतां त्याप्रमाणें मी कुणाचा हेरहि नाहीं किंवा बदमाशहि नाहीं, उलट तुमचा हितचिंतकच आहें. आपल्याला, बंगल्यावर पोहोंचतांच सारी हकीगत सांगतों. या वेळेपुरती मजवर दया करा."

"अच्छा, तब स्टार्ट करो गाडी."

बंगल्यावर पोंचल्यावर राजारामानें आपली सारी हकीगत शेटजींस सांगि-तली. ती ऐकून शेटजी विस्मितच झाले.

"मग ही हकीगत तूं मला आधींच कां नाहीं सांगितलीस? तुला मी माझा मुनीम म्हणून नेमला असता?" शेटजी म्हणाले.

"पण त्यावेळीं मला व्यापारासंबंधीं फारसें कांहीं कळत नसे. शोफर होण्याचीच त्या वेळीं माझी लायकी होती. आपल्याकडे मला शोफर म्हणून ठेवण्यांत माझ्या उपकारकर्त्यांचा हाच हेतू असावा. आपला शोफर झालों नसतों, तर व्यापारांतील खांचाखोंचा मला कळल्या नसत्या."

"ठीक आहे, ठीक आहे. तूं उद्यांपासून माझ्या प्रायव्हेट सेक्रेटरीचें काम पहात जा. माझ्या या उतारवयांत तुझ्यासारख्या चलाख माणसाची जोड मिळत असलेली पाहून मला फार आनंद होत आहे." शेटजी म्हणाले.

"यापुढें कुणाचाहि नोकर म्हणून न राहतां स्वतंत्रपणें धंदा चालवावा असें मला वाटूं लागलें आहे."

"काय म्हणतोस! स्वतंत्रपणें धंदा चालविणार? मग मला कां नाहीं

त्याचा फायदा घेऊं देत ? माझा भागीदार हो. आहे काय त्यांत मोठंसं ? होतोस ना ? ”

“ शेटसाहेब, आपल्यामुळंच तर मी एवढ्या स्थितीला पोंचलों. आपलं म्हणणं नाकारण्याची बेइमानी माझ्या हातून होईल तरी कशी ? ”

“ अच्छा, अच्छा. गोपालजी तमारा भला करो. तूं आजपासून माझ्या बरोबरीचा झालास. कल्याणजी ! ” आपल्या मेथाला हांक मारून शेटजी म्हणाले, “ पेढीवरच्या साऱ्या नोकरांना बजावून सांगा कीं, राजारामपंतांना यापुढं शोफर म्हणून कुणीहि हांक मारावयाची नाहीं. साऱ्यांनीं त्यांना शेटजी म्हणायचं. माझ्याशीं जसे वागतां तसंच त्यांच्याशीं वागायचं.”

* * * *

वालचंद शेटजींनीं रावसाहेब आठवल्यांना राजारामाच्या झालेल्या या स्थित्यंतराची हकीगत कौतुकपूर्ण शब्दांत लिहून पाठविली.

* * * * *

“ हें पहा पोरानें कसें भाग्य काढलें तें. आपला राजाराम शोफरचा शेट झाला. माझा हेतु पूर्णांचा सिद्धीला गेला. ” माईंना पत्र दाखवीत रावसाहेब म्हणाले. ही हकीगत ऐकून साऱ्यांना आनंद झाला. विशेषतः एका व्यक्तीच्या आनंदाला तर सीमाच नव्हती. राजारामाबद्दलचीं नाना-तऱ्हेचीं गोड स्वप्नें स्वप्नाळण्यांत ती दंग होऊन गेली होती. कोण बरें ही व्यक्ति ? होय, तीच ती. तुमचें ओंठावरलें स्मितच सांगतें आहे कीं, तुम्ही तिला ओळखलेंत. ओळखलेंत ना ? मग उगाच नांव कशाला सांगूं ?

# व्यवहार आणि रसिकता

"शाकु अन् शकुचा नवरा, आलीं आहेत पुण्याहून. टाउन हॉल-मध्यें चित्रांचं प्रदर्शन भरलं आहे. येतेस का, म्हणून विचारीत होती ती !" भीत भीतच वसुंधरेनें पतिराजांना म्हटलें.

सकाळपासून, ती विचारीन विचारीन म्हणत होती. तिच्या ओंठावर हे शब्द कितीदां तरी आले. पण भीति त्यांना आंतल्या आंत लोटी.

" जाऊं का, मग ?" काळ्याकुट्ट मेघावर सोनेरी किरण क्षणार्धंच जसा चमकून जावा तशी आशा, तिच्या उदासवाण्या चेहऱ्यावर चमकून गेली.

तिचे पतिराज बाहेर जाण्याच्या गडबडींत होते. त्यांच्या डोक्यांत कसल्या तरी विचारांचें चक्र चालू होतें.

" जा ना ! शकु आली आहे होय. बोलावते आहे तर जा. " त्यानीं तिच्याकडे पाहिलेंहि नाहीं. " मला संध्याकाळीं यायला अंमळ वेळ होईल हं." असें म्हणून ते निघून गेले.

वसुंधरेच्या उदासीन चेहऱ्यावर आनंदमिश्रित आश्चर्य झळकलें. जें पहाण्यासाठीं आपण अत्यंत उत्सुक होतों, तें पहावयाला मिळणार म्हणून तिला आनंद झाला होता, तर विशेष व्याख्यान न झडतां, कधीं न मिळणारें 'जा ना !' हें चटकन् दिलेलें होकारार्थी उत्तर ऐकून तिला आश्चर्य वाटत होतें. कधीं न घडणारी गोष्ट घडली हें पाहून, ती तिथल्या तिथेंच उभी राहून क्षणभर विचारहि करूं लागली. पण क्षणभरच ! 'अधिक विचार न करतां पडत्या फळाच्या आज्ञेचा फायदा घ्यावा, हेंच बरं,' असें म्हणून ती बाहेर पडण्याच्या तयारीला लागली.

## व्यवहार आणि रसिकता

वसुंधरेचें हृदय आनंदानें नाचत होतें. आणि तिच्या डोळ्यांपुढें, चलचित्राप्रमाणें, तिनें कल्पनेनेंच उभारलेलें चित्रांचें प्रदर्शन सारखें येत जात होतें. बाह्य जगाचें अस्तित्व त्या क्षणापुरतें तरी ती विसरली होती. केशप्रसाधन किंवा पोशाख करतांना सुद्धां प्रदर्शन, आणि त्या प्रदर्शनांत कांहीं ठिकाणीं प्रशंसा, तर कांहीं ठिकाणीं टीका, तर कांहीं ठिकाणीं टवाळकी करीत हिंडत असलेले आपण, आपली मैत्रिण शकु व तिचा स्वतःस सौंदर्यशास्त्रज्ञ म्हणविणारा नवरा प्रभाकर यांचींच चित्रें तिच्या डोळ्यांपुढून जात होतीं.

वसुंधरा लौकिकदृष्ट्या फारशी शिकलेली नव्हती. विश्वविद्यालयाच्या प्रवेश परीक्षेपर्यंतच तिचें शिक्षण झालेलें होतें. परंतु एका श्रीमंत, सुशिक्षित व पिढीजात सुसंस्कृत घराण्यांत तिचा जन्म झाला असल्यामुळें व विशेषतः तिचे वडील हे एक थिऑसॉफिस्ट असल्यामुळें, तिच्या अभिरुची तिच्या वयाच्या व तिच्याइतकें शिक्षण घेतलेल्या सर्वसामान्य तरुणींपेक्षां कितीतरी पटीनें उच्च होत्या. लहानपणापासूनच तिचा कल इतर शिक्षणापेक्षां कलाकुसरीच्या शिक्षणाकडेच अधिक असे. निरनिराळ्या तऱ्हेचें कपडे शिवणें, कशिदा काढणें, रेशमाचें भरतकाम करणें, निरनिराळ्या तऱ्हेच्या रांगोळ्या काढणें, बागेंत रंगीबेरंगी कांचा पुरून विविध आकृति तयार करणें, इत्यादींकडे तिचा फार ओढा. या गोष्टी शिकण्याला तिचा एक पाय नेहमीं पुढें असे. कागदावर चित्रें काढण्याची सुद्धां तिला फार हौस. शाळेंतील पुस्तकी शिक्षणाचा मात्र तिला अतिशय कंटाळा असे. विशेषतः गणित, भूगोल, पदार्थविज्ञान यांचे नाम आले म्हणजे तिचें डोकेंच दुखूं लागावयाचें. त्या तासांना बसणें म्हणजे तिला ती एक भयंकर शिक्षाच वाटे. तरी पण तिनें कशीबशी प्रवेशपर्यंत मजल मारली होती. तिच्या वडिलांना तिच्या आवडीनिवडी पूर्णपणें माहीत होत्या. आपल्या मुलीची कलेकडील प्रवृत्ति, इतर अविचारी पित्यांप्रमाणें त्यांनीं मारून टाकली नाहीं. तिला पोषक असें वातावरण त्यांनीं निर्माण केलें. तिला त्याबाबतचें शिक्षण मिळण्याची त्यांनीं व्यवस्था केली. आणि शक्य असतें तर मुलीला पुस्तकी शिक्षण देणाऱ्या शाळेंत न डांबतां, तिला इंग्रजी लिहायला वाचायला येऊं लागतांच तेथून काढून, तिला हवें असलेलें शिक्षण पूर्णपणें देण्याची त्यांनीं व्यवस्थाहि केली असती. परंतु सध्यांच्या लग्नाच्या बाजाराचा विचार करतां,

त्यानां तसें करणें शक्य झालें नाहीं. मुलीला चांगल्या संपन्न सुशिक्षित वराला द्यावयाची, म्हणजे तिचें मॅट्रिकपर्यंत तरी शिक्षण झालेंच पाहिजे! लग्नाच्या बाजारांत परीक्षांना जी किंमत आहे ती कलाकुसरीला नाहीं, हा विचार आल्यामुळेंच शाळेंतील अनवश्यक बौद्धिक शिक्षणानें आपल्या मुलीचें एक प्रकारें नुकसान होत आहे असें वाटत असूनहि, त्यांना ती गोष्ट डोळयाआड करावी लागली.

वसुंधरेचें दोन वर्षांपूर्वी एका धनिक तरुणाशीं लग्न झालें होतें. त्यांचें शिक्षण महाविद्यालयांतील प्रथम वर्षापुढें जरी गेलें नव्हतें, तरी ते इतर धनिक तरुणांप्रमाणें आळशी किंवा छंदी नव्हते. साहित्य किंवा कला यांच्या अभ्यासानें येणारी विशिष्ट सुसंस्कृतता जरी त्यांच्यांत नव्हती, तरी ते सुस्वभावी व सदाचरणी होते. त्यांच्यांत एकच दोष होता, तो म्हणजे द्रव्याची फाजील हांव आणि त्या हांवेबरोबरच येणारा कंजूषपणा. या हांवेमुळेंच ते व्यापारांत शिरले. वय २८-२९ वर्षांचें असेल नसेल, पण मोठमोठ्या दक्षिणी माणसांचीहि छाती होणार नाहीं, अशा जवाहिऱ्याच्या धंद्यांत ते शिरले. एका कच्छी जवाहिऱ्याकडे दोन तीन वर्षें काढून, त्या धंद्यांतलि बारीक सारीक ज्ञान त्यांनीं मिळविलें होतें, आणि आत्मविश्वास वाटूं लागतांच, त्यानीं धंद्यास सुरुवात केली होती. त्यांची व्यापारी बुद्धि चपल असल्यामुळें त्यांत त्यांस किफायतहि चांगलीच होई.

वसुंधरेवर त्यांचें गाढ प्रेम होतें. तिची टापटिपी, तिचें गृहकर्मकौशल्य, तिची आल्यागेल्यांच्या आतिथ्यांतिल तत्परता, यांबद्दल त्यांना अभिमान वाटे; आणि तिचा गोड स्वभाव म्हणजे त्यांना आपल्या संबंध दिवसाच्या कामानें श्रांत झालेल्या जीवासाठीं परमेश्वरानें निर्माण केलेला अखंड शीतळ असा चंद्रिकाप्रकाशच वाटे. पण एका गोष्टीचा मात्र त्यांना चीड येई आणि ती इतकी कीं कित्येकदां, वसुंधरेचा सहवास हा परमेश्वराचा आशिर्वादच आहे असें म्हणणारे ते तो शाप आहे, अशा मुलीशीं लग्न करून देऊन आपल्या वडिलांनीं आपलें वाटोळें केलें आहे, असें म्हणण्यास मागें पुढें पहात नसत. ही चीड आणणारी गोष्ट म्हणजे तिची सौंदर्यासक्तता. वसुंधरा स्वतः अंतर्बाह्य सुंदर होतीच, पण स्वतः भोंवतालची

सृष्टीहि सुंदर असावी असें तिला वाटे. निरनिराळ्या रंगाचीं लुगडीं, निरनिराळ्या पद्धतीनें कापलेलीं पोलकीं किंवा ब्लाउझ वापरणें; विविध प्रकारची केशरचना करणें; आपल्या घरांतील वस्तु जेथल्या तेथें पण आकर्षक रीतीनें मांडून ठेवणें. भिंती सुंदर सुंदर चित्रांनीं सुशोभित करणें, निरनिराळ्या तऱ्हेचे खाद्य पदार्थ करणें व त्यासाठीं लागणारीं भांडीं संग्रहीत करणें, या गोष्टी तिला फार आवडत. आपल्या नवऱ्यानें या साऱ्यांबद्दल अभिरुचि दाखवावी असें तिला वाटे. पण नवऱ्याला हें सारें छिचोरपणाचें, सभ्य गृहस्थाच्या बायकोला न शोभणारें, असें कृत्य वाटे. " असली ही राहणी वारयोपितांना शोभते. आमच्यासारख्या अब्रुदार लोकांच्या बायकांना शोभत नाहीं, " असे ते उद्गार काढीत. हे उद्गार ऐकले म्हणजे वसुंधरेला ब्रह्मांड आठवे. नवऱ्याची अशातऱ्हेची विचित्र विचारसरणी असल्यामुळेंच, आज तिनें प्रदर्शनाला जाऊं का म्हणून विचारलेल्या प्रश्नाला लगेच होकारार्थी उत्तर आलेलें पाहून, तिला आनंदाबरोबरच आश्चर्य वाटलें.

× × × ×

शकूच्या हातांत हात घालून टाऊन हॉलची एक एक पायरी चढतांना, जिथें आपल्या सौंदर्यपिपासू जीवाला कोणीहि बंधन घालूं शकणार नाहीं, अशा स्वर्गाच्या नंदनवनाचीच एक एक पायरी आपण चढत आहोंत असें तिला वाटत होतें.

टाऊन हॉलमध्यें भरलेल्या या प्रदर्शनाला एक प्रकारचें विशेषत्व आलेलें होतें. त्या विशेषत्वामुळेंच तें पहाण्याची कलाप्रेमी लोकांस विलक्षण उत्सुकता लागली होती. मुंबईखेरीज बंगाल, पंजाब, आंध्र वगैरे प्रांतांतील नामांकित चित्रकारांनीं आपलीं चित्रें प्रदर्शनार्थ पाठविलीं होतीं. निरनिराळ्या प्रांतांतील निरनिराळ्या विचारांच्या व ध्येयांच्या चित्रकारांच्या कृती एकत्र पहाण्याचा सुयोग मुंबापुरस्थांस आज पहिल्यानेंच प्राप्त झाला होता. ज्या ' महाराष्ट्र-कलोपासक मण्डळा 'नें हें प्रदर्शन भरविण्याची खटपट केली होती, त्याचें नांव त्यांतील कांहीं होतकरू चित्रकारांच्यामुळें सर्वतोमुखीं झालें होतें. या संस्थेनें चित्रकलेच्या बाबतींत पूर्ण उदासीन असलेल्या महाराष्ट्रीयांत त्याबद्दलची अभिरुची आपल्या अव्याहत प्रयत्नांचे योगें उत्पन्न केली होती.

या संस्थेचे मुख्य, रावबहादुर धराधर यांनीं इताली व फ्रान्स या देशांत पांच–सहा वर्षें राहून तिकडील चित्रकलेचा अत्यंत कष्टपूर्वक अभ्यास केला होता. रंगीत खडूंतील चित्रण व तसबिरकाम यांमध्यें त्यांचा हात धरणारा सबंध मुंबई इलाख्यांत कोणी नव्हता. पेंटिंग्सच्या बाबतींत मात्र ते पूर्णपणें अयशस्वी ठरले होते. पंजाब, बंगाल व आंध्र या प्रांतांतील चित्रकारांच्या कृतींत यथातथ्याबरोबरच प्रकट होणारें सृष्टींतील गूढत्व त्यांना केव्हांहि प्रकट करतां आलें नाहीं. चित्रकार हा नक्कल काढणारा नसून द्रष्टा आहे, प्रत्यक्ष सृष्टीकर्ता परमेश्वर आहे, ही कल्पना त्यांच्या जडवादी मनाला कधींच शिवली नाहीं. बंगाल, पंजाब, आंध्र वगैरे प्रांतांतील चित्रकारांनीं जुन्या भारतीय चित्रकलेच्या ध्येयांना, पाश्चिमेकडील प्रक्रियेची जोड देऊन अभिनव कला निर्माण करण्याच्या चालविलेल्या प्रयत्नांकडे ते तटस्थपणें पहात. बंगाल्यांतील अबनींद्रनाथ टागोरांच्या सांप्रदायाला तर त्यानीं वेड्यांतच काढलें होतें. 'ही सगळी चिनी–जपान्यांची नक्कल आहे,' असें ते म्हणत. पण याला विरोध करणाऱ्या कांहीं तरुण व्यक्ती त्यांच्याच मण्डळांत निर्माण झाल्या होत्या. हे तरुण त्यानीं रंगाविलेल्या चित्रांकडे पाहून त्यांना म्हणत, "साहेब, हे परकी चेहरे तुमच्या डोळयांआड केव्हां होणार? यांच्यांत कांहींतरी भारतीयत्व आहे का? आणि हें मागचं आकाश किती शून्य आहे! चित्रांत काव्यात्मतेबरोबरच कल्पनेचें विशालत्व नको का प्रकट व्हायला?" आपल्या तरुण सहकाऱ्यांचें हें बोलणें रावबहादुर धराधर शांतपणें ऐकून घेऊन म्हणत, "मला, तुम्हांला जे लोक आदर्श वाटतात, त्यांचीं कलेविषयींचीं ध्येयं पटत नाहींत व पटणारहि नाहींत, त्यांची कला सत्य असेल तर राष्ट्र त्यांना उचलून धरील, आम्हीं मागें पडूं. पाश्चिमेकडील कलावंतांना मी माझे गुरु मानतों व मानीन," त्यांचे सहकारी हंसून म्हणत, "वृद्धांना तरुणांचीं मतें केव्हांहि पटायचीं नाहींत."

धराधरांची मतें त्यांच्या सहकाऱ्यांहून भिन्न असतांहि केवळ त्यांच्या आग्रहाखातर प्रातिनिधीक स्वरूपाचें असें हें प्रदर्शन भरविण्याची त्यांनीं खटपट केली होती. अशा तऱ्हेच्या प्रातिनिधिक स्वरूपाच्या प्रदर्शनांत

पाऊल टाकतांच वसुंधरेसारख्या सौंदर्योपासक तरुणीचें मन आनंदानें उचंबळावें यांत नवल तें काय ?

तीं पहा, तीं तिघेंजणें त्या चित्राकडे कशीं अगदीं एकाग्रतेनें पहात आहेत !

" आहा, किती सुंदर रेखाटलं आहे हें ? कल्पना तरी किती उच्च आहे ! कोण असेल हा ?" वसुंधरेचे आपल्याशींच विचार चालले होते. कांहीं वेळानें शकूकडे वळून ती म्हणाली, " हिला म्हणतात खरी कला. खरं सृष्टि-कर्तृत्व तें हेंच. याच्यांतलं हें अमर्याद आकाश किती कुशलतेनं रेखाटलं आहे ! चंद्रतारकामय आकाशांतून वाहणारा तो अमृताचा अखंड स्रोत इथं झुळझुळ जणुं वाहत आहे. शकू, आमचे बाबा नेहमीं म्हणत असातात कीं, ' सौंदर्यपूर्ण वस्तूंच्या दर्शनानं दिव्यत्वाचा साक्षात्कार होत असतो. ' खरोखर त्याची प्रचिती अशा ठिकाणीं पटते. "

" या चित्राच्या कर्त्यांत आजूबाजूच्या इतर चित्रकारांहून कांहींतरी विशेष आहे यांत संशयच नाहीं, " शकू तें चित्र कौतुकानें पहात म्हणाली.

" तो उत्तम प्रतीचा स्वप्नद्रष्टा असावा असं मला वाटतं. या चित्रांत त्याच्यामधील अवतरलेलं सगुणत्व किती तेजस्वी आहे ! आपण हें विकत घ्यावं असं मला वाटूं लागलं आहे. अं. "

" जरूर, जरूर, मी सुद्धां तेंच म्हणणार होतों. "

" शकू, तुझं काय मत आहे ? " वसुंधरेनें विचारलें.

" माझं कसलं मत ! मी तुझ्यासारखा कलेचा थोडाच अभ्यास केला आहे ? पण मला आपलं असं वाटतं कीं, त्याला किंमतच नाहीं. एवढ्या सुंदर चित्राची पंचवीस रुपये किंमत म्हणजे कांहींच नाहीं. या पलीकडच्या नर्तकीच्या चित्राला शंभर रुपये किंमत ठेविली आहे तीच जर ह्याला ठेविली असती तर थोडसं तरी शोभलं असतं, " शकू म्हणाली.

" कुठल्या नर्तकीच्या चित्राला ? "

" या, या शेजारच्या. "

" हें नर्तकीचं का चित्र आहे ? ही तर शकुंतला ! "

" खालीं नांव लिहिलं आहे म्हणून म्हणते आहेस कीं काय ? ही नर्तकी नव्हे तर कोण ? वल्कलं पांघरणाऱ्या व अरण्यांत पर्णकुटी बांधून राहणाऱ्या

गरीब बिचाऱ्या कण्वाची शकुंतला छातीवर मोत्यांच्या झालरी लावून लहंगा नेसायला कधीं गेली होती ? ”

“ खरंच शकु, किती हिडीस दृश्य हें ? युरोपियन नर्तकीची ही नक्कल दिसते. हिचा हा पोशाख, हिचे हे डोळे, कांहीं तरी सात्विकता आहे का त्यांत ? वैषयिक भावनेशिवाय त्याच्यांत कांहींच प्रकट झालेलं नाहीं. कुणी बरं काढलं आहे हें ? आर. एस. दंडवते. ”

“ हा दंडवते म्हणजे माणूसच तसला आहे. बोहऱ्यांच्या दुकानावर आणा दोन आण्याला मिळणारीं नटींचीं चित्रं घ्यायचीं व इकडून तिकडून त्यांना मराठी पेहराव चढवायचा यापलिकडे कला कशाबरोबर खातात याची त्याला वास्तपुस्त सुद्धां नाहीं. त्या मोहिनी–मोहनच्या ‘ वांकडा डोळा ’ वगैरे कादंबऱ्यांवर यानंच चित्रं काढलीं आहेत. ” शकूचा नवरा प्रभाकर म्हणाला.

मोहिनी–मोहन आणि ‘ वांकडा डोळा ’ हे शब्द उच्चारल्याबरोबर वसुंधरेच्या अंगावर शहारे उभे राहिले. “ तें प्रकरण म्हणजे कांहीं विलक्षण आहे ! मनुष्य नंदनवनाला नरकाचं स्वरूप कसं आणूं शकतो याचं तें एक जंगी प्रत्यंतर आहे. हे लोक माणुसकीला कसे हो पारखे होतात ? ”

“ त्यांच्यांत माणुसकी असली तर ते पारखे होणार ! ” प्रभाकरपंत म्हणाले.

“ तेंहि खरंच, ” वसुंधरा हंसून म्हणाली.

“ बरं चला, आपण त्या पलीकडच्या विभागामध्यें जाऊं. प्रधानांचीं लॅंडस्केप पेंटिंग्स पाहिलीं आहांत का, वसुंधराताई, तुम्हीं ? ”

“ गेल्या वर्षी ‘ महाराष्ट्र–प्रतिभेच्या ’ खास अंकांत एक पाहिल्यासारखं आठवतं. ‘ जुहूचा समुद्रकिनारा ’ असंच कांहींतरी नांव आहे. तेच ना ते ? ”

“ हो, हो तेच ते. त्या माणसाच्या कुंचल्यांत काय असेल तें असो, एकप्रकारची विलक्षण जादु भरलेली आहे. आमच्या दिवाणखान्यांत टांगलेलं तें ‘ समुद्रावरील संध्याकाळ ’ त्यांचंच आहे. असा प्रतिभावान चित्रकार मी दुसरा पाहिला नाहीं. ज्यांची ज्यांची त्यांच्या चित्रांवर दृष्टि जाईल ते ते तन्मय झालेच पाहिजेत. प्रेक्षकाचा आत्मा पार्थिव देहाचे बंध तोडून त्यांनीं

निर्माण केलेल्या त्या सृष्टींत स्वैर विहरूं लागतो. कधींहि न उमगलेलीं सृष्टीच्या हृदयांतील गूढ रहस्यं त्याला स्पष्ट दिसूं लागतात. चर्मचक्षूंना दिसणारा निसर्गाचा मायावी पडदा कुशलतेनें हलकेच दूर सारून, त्याच्या मागं असलेल्या आनंदसृष्टींचं दर्शन करून देण्याचं कार्य महाराष्ट्रांतील फारच थोड्या चितान्यांच्या हातून घडलं असेल. हा त्यांनीं चितारलेला ' नर्मदा-कांठच ' पहा ना ! किती विलक्षण अनिर्वचनीयता यांत प्रकट झाली आहे ! नुक्तंच कुठं तांबडं फुटलं आहे; कोंवळे ताम्र किरण पानांवर, गवतावर, जललहरींवर लहान बालकांप्रमाणें बागडूं लागले आहेत; जागा झालेला चिमणा पक्षी आपलं चिमणं डोकं घरट्याबाहेर काढून किलबिल् किलबिल् स्वरांत देवाजीला आळवीत आहे; किनान्याच्या बाजूनं खांद्यावर नांगर टाकून शेतकरी आपल्या बैलांच्या मागून मंद मंद पावलें टाकीत चालला आहे; किती मनोहर दृश्य हें ! आणि चराचराला उल्हसित करणारे प्रातःसंध्येच्या वीणेंतील शांतरसाचे राग किती कुशलतेनं यांत उमटविले आहेत ! अशातऱ्हेच्या कारागिरांच्या कृती पाहिल्या म्हणजे कीं नाहीं, वसुंधराताई, आपण जर संस्थानिक असतों, तर किती बरं चांगलं झालं असतं, असं पुनः पुन्हां वाटूं लागतं. अशा कारागिरांवरून ओंजळी भरभरून सोन्याचीं नाणीं मी उधळलीं असतीं, " प्रभाकरपंत सहृदयतेनें म्हणाले.

" खरंच. अशा माणसांच्या गुणांचं चीज आपल्या देशांत होणं कठीण. कारागिराचं कर्तृत्व समजण्याएवढी बुद्धि आपल्या लोकांत अजून आलेली नाहीं. त्यांना बोहऱ्याच्या दुकानावरील चित्राची अन यांची सारखीच किंमत वाटायची. कलेबद्दलची अभिरुची आपल्यामध्यें अजून उत्पन्न व्हावयाची आहे. आणि ती जसजसा सुसंस्कृतांचा वर्ग वाढत जाईल तशतशी उत्पन्न होऊन विकास पावूं लागेल. तोंपर्यंत मघांच्या, शकुंतलेला नर्तकीचा वेश चढविणाऱ्या चित्रकाराचीच चलती होत राहणार, " वसुंधरा म्हणाली.

" त्या चित्राची आठवणसुद्धां नको काढूंस बाई, " शकू तिटकाऱ्यानें म्हणाली.

" मघांच्या चित्रासारखीं चित्रें या प्रदर्शनांत तुला कितीतरी आढळतील. ' गानदेवता ' किंवा ' नर्मदाकांठ ' यांसारख्या कृती हाताच्या बोटांवर

मोजण्या एवढ्याच. हीं चित्रें काढणाऱ्या कारागिरांचं कला हेंच जीवन असतं. आणि त्यामुळंच त्यांच्या कुंचल्यांतून सरस अशी सृष्टि निर्माण होते. ' शकुंतला ' कारांसारख्यांचेंहि कला हेंच जीवन असतं, पण तें दुसऱ्या अर्थी. लोकांच्या वैषयिक भावना क्षणभर जागृत करून त्या कैफांत त्यांच्या खिशांतून पैसे काढावयाचे व आपली खळगी भरायची हेंच त्यांचें ध्येय, " प्रभाकरपंत म्हणाले.

तीं तिघेंहि एक एक चित्र पहात पुढें पुढें सरकत होतीं. मधून मधून त्यांच्या तोंडून अजाणतां, ' अहा किती सुंदर !' असे उद्गार बाहेर पडत होते. कांहीं वेळ वसुंधरा एका चित्राजवळ उभी राहिली. सुप्रसिद्ध वंग चित्रकार अर्धेंदु गांगुली यांचें तें चित्र होतें.

" रजनी ! किति विलक्षण भव्यता याच्यांत निर्माण केली आहे ही ! ही पृथ्वी, त्यावर उभी असलेली ही नतवदना रजनी, तिच्या मस्तकाभोंवतालचं हें फिकट पिवळं तेजोवलय, त्याच्यामागं पसरलेलं असीम काळं आकाश आणि त्यांतून मधून मधून स्निग्ध हास्य करणाऱ्या बालचांदण्या; किती अपूर्व दृश्य आहे हें ! " वसुंधरा त्या दृश्यानें वेडावून गेली. त्या चित्रावरून दृष्टि काढावी असें तिला वाटेचना. शेजारींच भिंतीच्या बाजूला असलेल्या कोचावर ती बसली आणि त्या चित्राकडे सारखी टक लावून पाहूं लागली. तिच्या चेहऱ्यावर योगिनीचें गांभीर्य आणि बालकाची प्रसन्नता हीं एकाच वेळीं विराजत असलेलीं दिसत होतीं. निर्विकल्प समाधि याहून दुसरी कोणती असणार !

कांहीं वेळानें वसुंधरा आपल्या तंद्रींतून जागी झाली. तिनें आजूबाजूला पाहिलें. त्या विभागांत ती एकटीच होती. प्रभाकर आणि शकू दूरच्या एका विभागांत हिंडत होतीं. ती हळू हळू त्या दिशेनें जाऊं लागली. प्रभाकर शकूला मोठ्या उत्साहानें एकेक चित्र दाखवून त्याबद्दल पुनः पुन्हां माहिती सांगत होते. आणि तीहि—जवळ वसुंधरा नसल्यामुळें—खट्याळपणें त्यांना नानातऱ्हेचे प्रश्न विचारून भंडावून सोडीत होती. पण हें भंडावणें त्यांना किती मनापासून आवडत होतें ! त्यांच्या चेहऱ्यावरील तें लाडीक स्मितच पहा. वसुंधरा क्षणभर थबकली. अनिमिष नेत्रांनीं ती हें

सारें पहात होती. कलेविषयींचे सारे विचार डोक्यांतून जाऊन आतां निराळेच विचार तिच्या डोक्यांत घोळूं लागले. " प्रभाकरपंतांप्रमाणेंच ते जर आज माझ्याबरोबर असते तर ! आपण असंच—पण तें कुठलं व्हायला ! जव्हेरी बाजारांतील सौदेच त्यांना अधिक महत्वाचे वाटतात ! हूंऽऽऽ," तिनें एक लांब सुस्कारा सोडला. " लहानपणीं भावी जीवनाचें मी चितारलेलं चित्र असंच नाहीं का होतं ? पण आज ? आज त्याच्या चिंधड्या चिंधड्या होऊन त्या वाऱ्यावर उडून गेल्या आहेत." हे आणि अशाच तऱ्हेचे विचार तिच्या मनांत येऊं लागले होते. आत्तांपर्यंतची तिच्या चेहऱ्यावरील प्रसन्नता निघून जाऊन, त्याऐवजीं हृदय हालवून सोडणारी खिन्नता पसरली होती. गरीब बिचारी वसुंधरा ! सुखाचा वसंतकाल म्हणून गणलेल्या ऐन तारुण्यांतच विधीच्या विचित्र वागणुकीमुळें ग्रीष्माची जाळून टाकणारी दाहकता तिला मुकाट्यानें सहन करावी लागत होती.

" वसु, इथंचशी थबकलीस ?" परत येत असलेली शकू तिच्या खांद्यावर हात टाकून म्हणाली, " तुला तें पलीकडचें क्रेयॉन वर्क पहायचं नाहीं का ? "

" आतां राहुं दे, संध्याकाळ झाली. घरीं आतां परतलंच पाहिजे." आपले मनोविकार दाबीत व चेहऱ्यावर लटकें हास्य आणित ती म्हणाली.

" तुझं पाहायचं राहिलं आहे तेवढं पुरं कर कीं ? "

" जाऊं द्या. मला पेंटिंग्सच पहायचीं होतीं, तीं पाहिलीं. आठवडाभर आहे प्रदर्शन. येऊं पुन्हां केव्हां तरी ? "

" चलायचं मग ? " प्रभाकरपंत म्हणाले.

" हो. "

तीं तिघेंजणें हॉलच्या पायऱ्या उतरूं लागलीं. हॉलमध्यें येतांना वसुंधरेचें हृदय किती उल्हासानें नाचत होतें ? आणि आतां तो उल्हास वैवाहिक जीवनाच्या उदासवाण्या विचारांमुळें पायरी पायरीनें उतरत होता. 'ते आज बरोबर असते तर ? ' हा एकच प्रश्न तिच्या मनांतील उदासीन वातावरणांत सारखा विचारला जात होता.

* * * *

ती घरीं आली. दाराचे आंत पाऊल टाकतांच ठळक ठिकाणीं टांगलेल्या नवऱ्याच्या तसबिरीकडे तिची नजर गेली. “किती प्रेमळ नजर ही! अरसिक, अरसिक आहेत खरे! परंतु हा त्यांचाच दोष म्हणतां येईल काय? ते निराळ्या वातावरणामध्यें वाढले, मी निराळ्या वातावरणांत वाढल्यें. ते माझ्याप्रमाणें वाढले असते तर त्यांच्या आवडी निवडी कदाचित माझ्याच सारख्या असल्या. मग त्यांना दोष तरी कां द्यावा? ते रसिक नसले तरी प्रेमळ आहेत ना? हो, हो, खरोखरच प्रेमळ आहेत. माझं हें कलेवरील प्रेम, सौंदर्याची ही आवड त्यांना केव्हां केव्हां छिचोरपणाची वाटते. आपण तें सहन केलें पाहिजे. पुढें मागें त्यांचे हे विचार बदलतीलहि. हो, हळु हळु बदलतीलहि. उतावळेपणानं डोक्यांत राख घालणं बरं का?” तिच्या मघांच्या विचारांना आतां निराळीच दिशा लागली होती आणि तिच्या चेहऱ्यावर पसरलेली खिन्नता धुक्याप्रमाणें हळु हळु विरळ विरळ होत, समाधानाचा सूर्यप्रकाश त्यावर चमकूं लागला होता.

रात्रीं तिनें बिछान्यावर अंग टाकलें. पुन्हां तें चित्रांचें प्रदर्शन तिच्या डोळ्यांपुढें उभें राहिलें. आणि तीं दोन चित्रें! त्यांनीं तर तिला वेडच लावलें होतें, तिचें हृदय खळबळून सोडलें होतें. पण या खळबळींतूनहि एक मधुर नाद ऐकूं येत होता. पृथ्वीवर प्रकाश आणि छाया यांच्या लपंडावाच्या खेळाला मनोहारित्व आणणाऱ्या वायुच्या मुरलींतील तो नाद होता. ह्या नादावर सारी सृष्टि डुलत असते. सळसळणाऱ्या पर्णांतून, झुळझुळ वाहणाऱ्या ओढ्यांतून, गगनाला शेंडे भिडविण्याकरितां हपापलेल्या नदीकांठच्या वेळूच्या निबिड अरण्यांतून, प्रेमपिपासु युवयुवतींच्या, मोक्षकांक्षी भक्तांच्या हृदयांतून निघणारा नाद याचाच प्रतिध्वनि असतो. हाच प्रतिध्वनि वसुंधरेच्या हृदयांत उडालेल्या खळबळींतून निघत होता. वस्तुवादाची ढाल पुढें सरसावून, तर्काचें लखलखीत खड्ग हातांत घेऊन झुंज खेळण्याची सदा संवय असलेल्या माणसाला ही गोष्ट कल्पांतापर्यंतहि पटावयाची नाहीं. तुफान दर्यावर दरक्षणीं उत्पन्न होणाऱ्या पर्वतासारख्या भीषणस्वरूपी प्रचंड लाटांतहि सौंदर्य सांठविलेलें आहे असें कोणी म्हटलें, तर तो ‘काय मुर्ख आहे हा!’ असें म्हणून खदखदां हंसूं लागेल. या गोष्टी सौंदर्योपासकाच्या विशुद्ध

हृदयाशिवाय इतरांना कळणार नाहींत. अस्थिरतेमध्यें, अशांततेमध्येंहि एक प्रकारचें अज्ञात सुख भरलेलें असतें. तसें नसतें तर तरुण मनाला आपल्यावर संकटें यावींत, बिकट प्रसंग यावेत, प्रेमळ अंतःकरणाचा आपल्याला कांहीं वेळ विरह घडावा असें कां वाटलें असतें ?

वसुंधरेच्या मनांत कलेविषयींचे नानाविध विचार उदय पावत होते.

" कला ही मनुष्याची जीवनकला वृद्धिंगत करून त्याला तेजस्वी करण्यास सहाय्यभूत होते याची प्रचीती अशाच तऱ्हेच्या कृती करून देतात. ' गानदेवता ' पाहिल्याबरोबर माझ्या मनाची स्थिति किती विलक्षण झाली बरं ! अंधाराचं दार उघडून प्रकाशपूर्ण अशा नव्या सृष्टींतच मला कुणीतरी सोडलं असं वाटूं लागलं. संगीत आणि कला हीं आत्म्याच्या भाषा आहेत, हें पूर्णपणें न उकललेलं तत्त्व आज मला कळून आलं. या तत्त्वाच्या ज्ञानामुळं झालेला अननुभूत आनंद मी केव्हांहि विसरणार नाहीं. अहा, किती मधुर ही सृष्टि ! स्वर्ग याहून मधुरतर तो काय असणार ? "

हळुहळु तिच्या डोळ्यांवर निद्रेची झांपड पडूं लागली होती. स्वप्नसृष्टीच्या प्रवेशद्वाराशीं ती येऊन ठेपली होती. ते पहा कमलपुष्पाप्रमाणें तिचे डोळे मिटलेच. तिच्या चेहऱ्यावर किती मोहक मधुरिमा पसरला आहे हा !

* * * *

तीं दोन चित्रें विकत घ्यावीं असें तिला फार वाटत होतें. त्यांची किंमत अवघी पन्नास रुपये होती. गेल्या दिवाळसणांत तिला माहेरीं ओंवाळणींतून मिळालेले कांहीं पैसे होते. शकूच्या नवऱ्याला सांगून त्या चित्रांवर ' फ्रेम ' ठेवण्याची तिनें व्यवस्था केली.

* * * *

• आज तिच्या आनंदाला कांहीं पारावार नव्हता. प्रदर्शन आटोपल्यामुळें तिचीं तीं आवडतीं चित्रें घरीं आली होतीं. तिनें तीं आपल्या झोंपण्याच्या खोलींत, दिव्याचा किंवा सूर्याचा प्रकाश चित्रांतील रंग खुलून दिसतील अशा रितीनें पडावा अशा कुशलतेनें टांगलीं. " स्वारी आली म्हणजे दाखवीन हीं त्यांना ! हो पण त्यांना हें आवडेल का ? रागावतील आणि माझ्या-

वर शिव्यांचा वर्षाव होईल. आणि मी खर्च केलेल्या रकमेचा आंकडा कळला म्हणजे तर त्रागा, त्रागा, त्राग्याला सारखी सुरवात होईल. " त्यांच्या त्या डोळ्यापुढें उभ्या राहिलेल्या क्रुद्ध चेहऱ्यामुळें तिला क्षणभर कांपरेंच भरलें.

* * * *

आज ते अगदीं खुषींत होते. जेवण झाल्यावर वसुंधरेला ते म्हणाले, "ऐकलंस का ? मी आज छानच सौदा पटविला आहे ! काय सांगूं, मी म्हणतों आहें तेवढ्याला जर तो माल पुनः विकला गेला तर–तर एका माण-साला मी एक मोठें बक्षिस देणार आहें. कसलं बक्षिस ठाऊक आहे ? पुष्कळ दिवसांपासून तें तुला द्यायचं माझ्या मनांत आहे. 'ब्यूक मोटारगाडी;' मग तुला तिच्यांतून फिरायला जायला मिळेल ! मला घेशील का मग त्या गाडींत ? " ते अगदीं खुषींत येऊन बोलत होते.

"इश्श मेलं. कांहीं तरीच विचारायचं ? मीहि पण..."

"तूंहि पण काय ?"

"मीहि पण आपणाच सारखा सौदा केला आहे."

"कसला ? भांडीं कीं चित्रं ?"

"चित्रं. खरंच किती सुंदर आहेत नाहीं ?" भिंतीवर टांगलेल्या चित्रां-कडे बोट दाखवून ती म्हणाली.

"काय दिलंस त्यांना ? आठ आणे–रुपया," अगदींच अरसिकपणें ते म्हणाले.

"आठ आणे–रुपयाला का असलीं चित्रं मिळतात ?"

"मग, मग किती दिलेस ?"

"पन्नास, माझ्या ओंवाळणीच्या पैशांतून."

"काय पन्नास ! असल्या भिकार चित्रांना पन्नास रुपये ! खास खास तुला फसवलं. तुला वेड लागलं आहे का ? छे, छे, छे, तूं बहकत चाललीस. हें चित्रांचं वेड मला नागवणार ! काय हें, काय हें ! या भिकार रंगीबेरंगी कागदांच्या तुकड्यांकरीतां पन्नास रुपये ! पन्नास रुपये मिळविण्याकरितां काय श्रम करावे लागतात याची तुला कल्पना आहे काय ? कशी असणार ! चैनबाज थिऑफिस्टाची मुलगी तूं, तुला ती काय असणार ? मला असल्या

या उधळपट्टीला आळा घातलाच पाहिजे. आज तूं पन्नासच रुपये खर्च केलेस उद्यां पांचशें करशील. आणि मला दिवाणी तुरुंगांत बसावं लागेल, आणि म्हणून म्हणून—" त्यांच्या रागाचा पारा वर वर चढत होता " आणि म्हणून ज्या वस्तूंनीं तुला भुरळ पाडली त्या वस्तूच तुझ्यासमोर नष्ट करतों." त्यांनीं तीं भिंतीवरील चित्रें खसकन् ओढीलीं आणि रागानें जमिनीवर आपटलीं आणि ते दाण दाण पाय आपटीत आपल्या खोलीकडे निघून गेले. त्यांचेवरील कांचेचे व तबकड्यांचे तुकडे तुकडे झाले होते आणि आंतील चित्रें छिन्नभिन्न झालीं होतीं. वसुंधरेला वाटलें, आपल्यालाच तंगडीला धरून यांनीं जमिनीवर कां नाहीं आपटलें आणि छिन्नभिन्न करून टाकलें ?

त्या छिन्नभिन्न झालेल्या चित्रांप्रमाणें तिच्या साऱ्या उमेदी छिन्नभिन्न झाल्या होत्या. भिंतीला पाठ टेंकून ती जी उभी होती तशीच होती. तिच्या डोळ्यांतून अश्रुबिंदू, सरांतून गळून पडणाऱ्या मोत्यांच्या दाण्यांप्रमाणें खालीं पडत होते. जिकडे तिकडे अंधारच अंधार पसरलेला तिला भासत होता.

आणि पलिकडच्या खोलींत ते—तिचे पतिराज—जव्हेरी बाजारांत पटविलेल्या सौद्याचें परीक्षण करीत होते. त्यांच्या हातांत मोत्यांचे सर होते. त्या सरांतील मोतीं मोजण्यांत व त्यांवर आपणास किती पट नफा मिळवितां येईल या विचारांत ते गुंग होऊन गेले होते. पत्नीच्या डोळ्यांतून खालीं पडणाऱ्या अश्रूमौक्तिकांची त्यांना काय किंमत ? जव्हेरी बाजारांत त्यांना एक पै तरी किंमत येणार होती का ?

# एकनिष्ठ प्रेम

[ १ ]

कित्येक दिवसांच्या आजारामुळें तिचें शरीर कृश झालें होतें. वर उठून बसण्याएवढें सुद्धां तिच्या आंगांत त्राण राहिलें नव्हतें. प्रभातकालीन सुवर्णप्रभेप्रमाणें तिच्या चेहऱ्यावर एकेकाळीं विलसत असलेलें तेज आज पार मावळून जाऊन, त्यावर पांडुरता पसरली होती. सबंध दिवसाच्या श्रमांमुळें श्रांत झालेल्या मनाला उल्हसित करणारा तिचा मधुर आवाज आज अत्यंत क्षीण झाला होता. तिच्या शुभ संचारामुळें प्रेम, पावित्र्य आणि आनंद यांचें माहेरघर बनलेलें आनंदरावांचें शांतिसदन आज शोकसदन बनलें होतें. जिकडे तिकडे भेसूर उदासीनता पसरली होती.

“ ऊं: ऊं: ऊं:ऽ ऽ ” आनंदीबाईनीं आपले जड डोळे, एका कुशीवरून दुसऱ्या कुशीवर कण्हत कण्हत उलटत असतां, मोठ्या कष्टानें उघडले आणि आपला कृश हात शेजारीं बसलेल्या आनंदरावांच्या मांडीवर ठेवून त्यानीं ते पुन्हां मिटून घेतले. दोन शब्द बोलण्याची इच्छा होती; पण ते ओंठाच्या बाहेरहि पडले नाहींत. डोळ्यांतून मात्र दोन अश्रुबिंदु ओघळून बिछान्यावर पडले.

आनंदरावांच्या काळजांत धस्स झालें. त्यांचा कंठ भरून आला. ते जवळ गेले व तिचें मस्तक त्यांनीं हलकेच आपल्या मांडीवर उचलून घेतलें.

तिनें एक जोराचा हुंदका दिला.

आनंदरावांच्यानें आतां राहवेना. सारा प्राण एकवटून त्यांनीं तिला हांका मारावयाला सुरवात केली.

" आनंदी ! आनंदी ! आनंदी ! " तिच्या केंसावरून त्यांनीं हलकेच हात फिरविला. त्यांनीं आपलें मुख तिच्या मुखाकडे नेलें.

तिचें श्वसन अतिशय मंद चाललें होतें. तिच्या चेहऱ्यावरची कळा बदलत चालली होती. शरीर गार गार होत चाललें होतें.

" देवा रे ! ! " आनंदरावांनीं हृदयभेदक अशी किंकाळी मारली.

आनंदरावांची ती किंकाळी ऐकून घरांतील चाकरमाणसें जागीं होऊन खोलींत धांवत आलीं. बनुमावशींच्या कुशींत झोंपीं गेलेला प्रभाकरहि जागा होऊन, आईच्या बिछान्याशीं रडत रडत आला.

प्रभाकरला पाहतांच आनंदरावांच्या शोकाला कांहीं सीमा राहिली नाहीं. त्यांनीं त्याला आपल्या हृदयाशीं कवटाळलें आणि ' हो, हो, ' करून रडावयास सुरवात केली.

" आतां यापुढचं जगणं कसलं ! जिवंत असून मेल्याचसारखी स्थिति ! " कांहीं वेळानें अंगावरच्या उपरण्यानें अश्रु पुशीत ते दारुण निराशेनें उद्गारले.

आनंदीबाईचें चेतनाविहीन निस्तेज शरीर कृष्ण पक्षांतील त्या मध्यरात्रीं भरल्या घरांतून बाहेर पडलें. आनंदरावांना आपलें काळीजच कोणीतरी कापून नेत आहे असें वाटलें. एखाद्या वेड्याप्रमाणें, तारवटलेल्या डोळ्यांनीं त्याकडे ते पहात होते.

मातापित्याच्या निधनानंतर आनंदरावांचा जर कोणता काळ अत्यंत सुखांत गेला असेल, तर तो विवाहानंतर आनंदीबाईच्या सानिध्यांतलाच. सहा वर्षें केव्हां आणि कशीं निघून गेलीं, हें त्यांना कळलें देखील नाहीं. कचेरी सुटली की, इकडे तिकडे कुठेंहि न जातां तडक घरीं यावें, थट्टा विनोद करीत थोडासा अल्पाहार करावा आणि मग गांवाच्याबाहेर एकटेंच फिरावयाला जावें. केव्हां केव्हां एखादा दुसरा स्नेहीहि बरोबर असे. आनंदराव भजनपूजनाप्रमाणें सहलीलाहि एकांत आवश्यक आहे, असें मानणाऱ्यांपैकीं एक होते. त्यांना आपल्याबरोबर दुसऱ्या कोणी येणें फारसें आवडत नसे.

गांवाच्या बाहेरील टेंकडीवरील एका ठराविक झाडाखालील एका ठराविक खडकावर सभोंवतालच्या सृष्टिसौंदर्याचा मनमुराद उपभोग घेत ते स्वस्थपणें पडत आणि दिवस मावळावयाच्या अगोदर घरीं येत. घरीं

आल्यावर आरामखुर्चीवर कांहीं वेळ अंग टाकून, ते त्या दिवशींचीं वर्तमानपत्रें नजरेखालीं घालीत. यावेळीं आनंदीबाई जवळ असत. कित्येकदां त्याच वर्तमानपत्रांतील महत्त्वाचे अग्रलेख वाचून दाखवीत. आठ वाजतां एकदमच दोघेंहि जेवावयास बसत. जेवतांना दोघांचे तत्कालीन राजकीय, सामाजिक, साहित्यविषयक चळवळींवर वादविवाद होत. दोघेंहि बहुश्रुत, दोघांनाहि वादविवादाची हौस ! मग काय, ताटांतील पक्वान्नांपेक्षांहि अतीव मधुर अशीं हीं बौद्धिक पक्वान्नें होत.

आनंदरावांचें वय जवळ जवळ तीस-बत्तीस वर्षांचें होतें. वयाच्या चोविसाव्या वर्षीं ते एल्. एल्. बी. झाले आणि अवघ्या सात-आठ वर्षांत एक हुषार विद्वान वकील म्हणून त्यांनीं लौकिक मिळविला. त्यांची मासिक प्राप्ती चार-पांचशेंहून अधिक होती. शिवाय घरची थोडीशी शेतीवाडीहि होती. आनंदराव सर्वतोपरी सुखी होते. जग हें आनंदमय आहे असें त्यांना वाटे. परंतु पाषाणहृदयी काळाला हें त्यांचें सुख पाहवलें नाहीं. आनंदीबाईच्या गळयाभोंवतीं मृत्युचे पाश हळुहळु अडकवून त्यांना त्यांच्यापासून त्यानें कायमचें हिरावून घेतलें. आनंदरावांना दुःखाची खरी जाणिव यावेळीं झाली. आंत आणि बाहेर वणव्याच वणवा पेटला आहे असें त्यांना वाटूं लागलें.

[ २ ]

दिवसांमागून दिवस जाऊं लागले. आनंदीबाईच्या मृत्यूमुळें आप्तेष्टांना व घरांतल्या माणसांना वाटणारी हळहळ बरीच कमी झाली होती. त्यांचे चेहरे पूर्ववत उल्हसित दिसूं लागले होते.

‘ गेलेलं माणुस का आतां पुन्हां येणार आहे ? ऋणानुबंध काय होता त्या प्रमाणें ती आली, झालं ! विधिलिखित जर तसं असेल तर त्याला कुणाचा उपाय चालणार ! बरं, वय का निघून गेलं आहे ? परवां देसायांकडची मंडळी म्हणत होती, आपल्या कमळीबद्दल तेवढं विचारतां का म्हणून ! ’ बनुमावशी शेजारच्या पार्वतीकाकूंना अशा तऱ्हेच्या गोष्टी सांगतांना आढळून येऊं लागल्या. छोटा प्रभाकर तर राघूला ‘ शुभं भवतु ’ शिकविण्यांत,

मनीची शेपटी ओढून तिच्या खोड्या काढण्यांत, मोत्याशीं खेळ खेळण्यांत आईला केव्हांच विसरून गेला होता.

आनंदरावांच्या चेहऱ्यावरचें औदासिन्य मात्र यत्किंचितहि कमी झालें नाहीं. त्यांची आनंदी वृत्ति पार मावळून गेली. त्यांना कशांतच उत्साह वाटेनासा झाला. कोर्टांतसुद्धां ते जाईनातसे झाले, सकाळपासून संध्याकाळपर्यंत सारखे विचार, विचार, विचार!

'मनावर परिणाम होऊन भलतंच कांहीं नाहीं ना होणार?' त्यांचे कित्येक स्नेही साशंक होऊन म्हणूं लागले.

आज बरेच दिवसांनीं आनंदराव ओटीवर येऊन बसले होते. शेजारींच प्रभाकर एका छोट्या वेताच्या खुर्चीवर बसून आपल्या इसापनीतींतील गोष्टी वडिलांना वाचून दाखवित होता. गेल्या दोन दिवसांपासून त्यांच्या चेहऱ्यावर थोडासा तजेला दिसूं लागला होता. घरांतल्या मंडळींशीं पूर्वीप्रमाणें मनमोकळेपणानें थोडें थोडें ते बोलूं लागले होते.

"महादू बंदरावर केव्हांसा गेला आहे रे!" प्रभाकराला मध्येंच थांबवून त्यांनीं विचारलें.

"महादू होय. तो मघांच गेला. मी येतों म्हणालों पण मला नेलन् नाहीं, दादा!"

"उन्हाचा त्रास होईल म्हणून नसेल नेलन्"

"अन् त्याला नाहीं का त्रास होणार?"

"तो मोठा आहे."

"मग मीहि मोठा झालों म्हणजे मलाहि जातां येईल नाहीं?"

आनंदरावांना हंसूं आलें. जवळच बागेंत काम करणारा म्हातारा ग्यानबाहि मोठ्यानें मागें वळून हंसला. "आमच्या धनीसाहेबांच्या वाणीसारखं त्यांना अखंड आयुष्य देवानं द्यावं." तो सद्गदीत स्वरानें म्हणाला. इतक्यांत फाटकाशीं गाडी खडखडली.

"आला वाटतं!" खुर्चीवरून गडबडीनें उठत आनंदराव म्हणाले.

गाडींतून आनंदरावांच्याच वयाचा एक गृहस्थ खालीं उतरला. "तुझीच

वाट पहात बसलों होतों." दोन पावलें पुढें जाऊन त्यांचा हात हातांत घेऊन आनंदराव म्हणाले.

तो गृहस्थ कांहीं बोलला नाहीं. त्यानें त्यांना कडकडून आलिंगन दिलें. कित्येक वर्षांनंतर आज दोघांची भेट होत होती. प्रभा हें सारें पहात एका बाजूला विस्मयानें उभा राहिला होता.

[ ३ ]

" वसंत, तुझं म्हणणं का मला पटत नाहीं ? पण माझ्या मनाची स्थिति अशी कांहीं विचित्र झाली आहे कीं, ती धडपणें शब्दानें सांगवत नाहीं. प्रभाकडे पाह्यलं म्हणजे वाटतं कीं, सध्यां स्वीकारलेला मार्ग योग्य होणार नाहीं. आपुलकीनें त्याची निगा ठेवणारं कुणीतरी कळकळीचं माणूस पाहिजे. पण तसं माणूस सांपडणं फार कठीण. "

" कांहीं कठीण नाहीं. तूं फक्त 'हो' म्हणण्याची फुरसत, मी अशीं हजार माणसं तुझ्यासमोर आणून उभीं करीन."

" बाजारांतलि गुरं का रे तीं ?" आनंदराव थट्टेनें हंसत म्हणाले.

" झालं, लागलास मघांसारखं बोलायला. तुझ्यापुढं बुवा बोलण्याची सोयच नाहीं."

" सोय नाहीं कशी ? तूं बोलायला लागलासच तसा. घरोघरीं अशीं प्रेमळ अंतःकरणं सांपडलीं असतीं तर जगांतलीं निम्मीं दुःखं कमी झालीं असतीं. वेडा कुठला. जाऊं द्या. आपण तो विषयच बदलूं. तूंत एखादा शिक्षक ठेवून माझ्याच देखरेखीखालीं त्याची जेवढी कांहीं व्यवस्था ठेवतां येईल तेवढी ठेवण्याचा मी प्रयत्न करणार. पुढें भगवंताच्या मर्जीनुसार जें काय होणं असेल तें होईल. त्याच्यावरच सर्वस्वी भार टाकून स्वस्थ राहण्याचा मीं निश्चय केला आहे. त्याला दया आली तर सर्व कांहीं ठीक होईल. नाहीं तर—" आनंदरावांचा कंठ सद्गदीत झाला. त्यांच्यानें पुढें बोलवेना. त्यांनीं मान खालीं घातली व शून्य दृष्टीनें ते जमिनीकडे पाहूं लागले.

वसंतरावांचें अंतःकरण खळबळलें. त्यांच्या डोळयांत खळकन् पाणी आलें. त्यांच्याहि तोंडांतून शब्द बाहेर पडला नाहीं.

## एकनिष्ठ प्रेम

वसंतराव व आनंदराव हे एकमेकांचे जिवश्चकंठश्च स्नेही. आनंदराव पाठच्या भावाहूनहि त्यांजवर प्रेम करीत. आनंदीबाईहि त्यांना व त्यांच्या कुटुंबांतलि मंडळीला आपल्याच कुटुंबांतील माणसांप्रमाणें आत्मियतेनें वागवीत. गेलीं दोन चार वर्षे ते कलकत्त्याला व्यापारधंद्याच्या निमित्तानें जाऊन राहिल्यामुळें दोघांची बरेच दिवस भेट झाली नव्हती. परवां आनंदीबाईच्या --आपल्या प्रेमळ वहिनीच्या--मृत्यूची वार्ता कळतांच ते ताबडतोब मालवणास निघून आले. दोन दिवस घरांतील सर्व परिस्थितीचें निरीक्षण केल्यावर आनंदरावांना योग्य सहचारिणीची जोड देणेंच आवश्यक आहे असें त्यांना आढळून आलें. तिच्या अभावीं त्यांच्या आयुष्याला निराळेंच एखादें वळण लागण्याचा संभव होता. यामुळें त्यांनीं आज आनंदरावांचें मन थोडेंसें प्रसन्न आहे असें पाहून त्याबद्दलचा प्रश्न काढला. परंतु आनंदरावांकडून त्याचें फारसें समाधानकारक उत्तर आलें नाहीं. 'आज ना उद्यां त्याला त्याची जरूरी भासेल' ते मनांत म्हणाले. "जिव्हाळयाचं माणूस जवळ असल्याशिवाय याच्यासारख्या प्रेम हेंच जीवन असलेल्या माणसाला खरं सुख लाधणं शक्य नाहीं."

यापुढें या विषयावर एकहि शब्द न बोलण्याचें त्यांनीं ठरविलें. 'वेळ आली म्हणजे सर्व कांहीं व्यवस्थित घडून येईल,' त्यांनीं मनांत विचार केला.

वसंतराव शांतिसदनांत जवळ जवळ एक पंधरवडाभर होते. एवढ्या मुदतींत त्यांनीं आपल्या प्रेमळ व विनोदी स्वभावाच्यायोगें आनंदरावांचें मन बरेंच प्रफुल्लित केलें होतें, त्यांच्यामध्यें उत्साह उत्पन्न केला होता. आनंदरावांना पुन्हां, जग दुःखमय नसून आनंदमयच आहे असें वाटूं लागलें होतें. 'माणसानंच आपल्या अज्ञानामुळं दुःख उत्पन्न केलं आहे. वास्तविक पाहूं गेलं असतां तें तसं नसून केवळ आभास आहे ! दश-दिशांत सांठवून ठेविलेल्या सौंदर्याचा खजिना मानवाला दुःख देण्याकरितां का त्यानें निर्माण केला ? दुःख, दुःख, कुठं आहे दुःख !' आनंदरावांच्या विचारांचा ओघ आतां बदलूं लागला. ते मित्रमंडळींत जाऊं लागले. वाचन, मनन व टेकडीवरील दैनिक सहल हीं पूर्ववत् सुरू झालीं. प्रभाचें चिमुकलें मस्तक आपल्या मांडीवर घेऊन ते तुकाराम-नामदेवांचे अभंग एकतारीवर घोळ घोळून

म्हणण्यांत चूर होऊं लागले. धनीसाहेबांची ही लवकरच बदललेली परिस्थिती पाहून नोकरांचाकरांना आनंद झाला. म्हाताऱ्या ग्यानबाच्या अंगांत शंभर हत्तींचें बळ आलें.

[ ४ ]

आनंदराव आपला बहुतेक वेळ प्रभाकराकडे लक्ष देण्यांत घालवूं लागले. त्याला त्याच्या आईची आठवण होऊं न देतां, ज्या ज्या गोष्टींनीं त्याचें मन प्रफुल्लित राहील त्या त्या गोष्टी करण्याचा ते प्रयत्न करूं लागले. त्यांनीं त्याच्याकरितां आपल्या खोलीशेजारील एक भरपूर उजेडाची हवाशीर खोली मोकळी केली. त्यांत त्यांनीं उत्तमोत्तम चित्रें आणून लाविलीं. देवादिकांच्या व थोर थोर पुरुषांच्या तसबिरी टांगल्या. रंगीबेरंगी चित्रांनीं भरलेलीं गोष्टींचीं पुस्तकें एका लहानशा कपाटांत आणून ठेविलीं.

प्रभाकराला गाणें फार आवडे. कुणी गाऊं लागला किंवा पेटी वाजवूं लागला कीं, त्याच्या पायांनीं तिकडे धांव घेतलीच. आईकडूनच त्याच्या अंगांत हा गुण आला होता. आनंदीबाई गाण्याच्या–विशेषतः तंतुवाद्याच्या–फार शोकी होत्या. गावांत एखादा चांगला गवई, किंवा सतार, बीन वाजविणारा माणूस आला म्हणजे त्याची खास बैठक आनंदरावाकडे हटकून व्हायचीच. आनंदीबाईंना स्वतः सतार व बीन सुंदर वाजवितां येई. पहांटे पांच वाजतां उठून तास दीड तासपर्यंत सूरदास, मिराबाई किंवा कबीर यांचीं पदें त्या सताराच्या किंवा वीणेच्या तारेवर आळवीत बसत. प्रभा मग आईच्या कुशींत डोकें खुपसून स्वस्थ ऐकत पडे. त्याची ही प्रवृत्ति पाहून आनंदरावांनीं एका गवयाची नेमणूक केली. त्यानें संध्याकाळीं त्याच्या खोलींत एक तासभर गावें आणि निघून जावें. त्याची एखादें गाणें शिकण्याची लहर लागली तर तें शिकवावें.

एक दिवस सुमुहूर्त पाहून मोत्या, मनी व राघू या आपल्या जिवलग मित्रत्रयांसह या आपल्या नवीन खोलींत त्यानें प्रवेश केला.

मोत्यानें एका कोंपऱ्यांत आपलें ठाणें मांडलें, मनी गादीवर जाऊन बसली, राघूचा पिंजरा पलंगाशेजारींच एका दांडीला टांगण्यांत आला.

"राघोबा, राघोबा, माझी खोली कशी आहे ?"

पिंजऱ्यांतील दांडीवर झोंके घेत राघू बोलला, "शुभं भवतु !"

[ ५ ]

आनंदरावांना वाचनाचा फार नाद असे. एखाद्या चांगल्या लेखकानें लिहिलेलें पुस्तक प्रसिद्ध झालें आणि तें त्यांनीं घेतलें नाहीं असें कधींच झालें नाहीं. दरवर्षी त्यांचे दोन–चारशें रुपये तरी निदान पुस्तकांकरितां खर्च होत. त्यांच्या ग्रंथसंग्रहांतील ग्रंथांची संख्या चार–पांच हजारांवर गेली होती. काव्य, कादंबरी, इतिहास, तत्वज्ञान, अर्थशास्त्र, मानसशास्त्र, समाजशास्त्र वगैरे शास्त्रांतील बहुमोल ग्रंथ त्यांच्या संग्रहीं होते. विलायतेंतील रिव्ह्यु ऑफ रिव्ह्युज, फॉर्टनाइटली रिव्ह्यु, करंट ओपिनियन, मरक्युरी, हिबर्ट जर्नल यांसारखीं भारदस्त मासिकें ते मुद्दाम वर्गणी भरून मागवीत. या मासिकांचे ते एकांतिक वाचक होते. रात्रौ तास दीडतास तरी एखादा उत्कृष्ट ग्रंथ वाचण्यांत घालवावयाचाच असा त्यांचा नित्यनेम असे त्यांच्या या बहुविध व्यासंगामुळें मालवणच्या सुशिक्षित समाजांत त्यांना फारच आदरानें वागविलें जाई. तरुण माणसांना तर ते आदर्शभूत वाटत. उच्च शिक्षण संपादण्याकरितां, पुण्या–मुंबईच्या बाजूला गेलेले विद्यार्थी हिंवाळ्याच्या सुट्टींत घरीं आले म्हणजे दररोज संध्याकाळीं आनंदरावांच्या बंगल्यावर जमा होत. या मंडळींचे मग निरनिराळ्या विषयांवर वादविवाद चालत. व्यासंगी वक्ता आणि जिज्ञासु श्रोते; मग काय ? वाग्गंगा दुथडी वाहावयाला लागावयाची. आनंदरावांना खऱ्या समाधानाचे जर कोणते दिवस जात असतील तर ते हेच. थोर थोर ग्रंथकारांच्या कृतींपासून झालेला अमित आनंद कोणापुढें तरी प्रगट करावा, त्यांचें हृद्गत समजावून द्यावें, त्यांतील सौंदर्यस्थळें दाखवावीं असें त्यांना फार वाटे. घरच्या ग्रंथालयांत वाचीत पडले असतां एखादा अभिनव विचारांनीं भरलेला भाग आला म्हणजे त्यांना जो आनंद होई तो व्यक्त कसा करावा हेंच त्यांना कळत नसे. ते खोलींत मग इकडे तिकडे स्वतःशींच पुटपुटत, केव्हां केव्हां मोठमोठ्यानें हंसत हातवारे करीत फिरत. 'किती ओजस्वी भाषा ही, आणि विचार तरी किती खोल ? अहाहा ! तूं महात्मा आहेस यांत संशय नाहीं ! धन्य ! धन्य !' त्यांचें मस्तक त्यांना नकळतच

आदरानें, कित्येक मैल अंतरावर असलेल्या त्या ग्रंथकाराच्या कल्पनेनें डोळयांसमोर उभ्या केलेल्या मूर्तीपुढें नत होई. कांहीं क्षण देहाची स्मृति नष्ट होई. त्यांचा आत्मा ग्रंथांतील नूतन विचारांच्यायोगें निर्माण झालेल्या आनंदसृष्टींत स्वैर तरंगूं लागे.

दिवस मावळला. रजनी काळी चंद्रकळा नेसून द्रुतगतीनें इतस्ततः संचार करूं लागली. आणि तिच्या विपुल व विस्तीर्ण केशकलापांत गुंफलेलीं तीं तेजस्वी हिरे–माणकें, पृथ्वीवर पेटणाऱ्या असंख्य दीपांकडे पहात, डोळे मिचकावीत म्हणूं लागलीं, ' एका क्षणाचीहि शाश्वती नाहीं पण कोण हा यांचा दिमाख !' 'दिमाख ?' सर्व शक्ति एकवटून, जळजळणाऱ्या निखाऱ्याप्रमाणें लाल डोळे करून सर्व दीपांनीं रागानें विचारलें. त्यांनीं उत्तर दिलें नाहीं. तीं तिरक्या नजरेनें गालांतल्या गालांत हंसलीं मात्र. दीपकांचा राग अधिक भडकला आणि त्यांनीं आपल्या शिखा दोन चार वेळां फडफड केल्या.

ते पहा, आनंदराव अर्धोन्मीलित नयनांनीं आपल्याशींच कांहींतरी पुटपुटत आहेत. पलीकडे टेबलावर एक भलें जाड पुस्तक पडलें आहे. " मृत्यू ! मृत्यूची एवढी भीति कसली ! माणसं उगाच भितात. त्याच्यासारखा सन्मित्र अन्यत्र सांपडणें नाहीं. माणसं त्याला क्रूर काळ असं म्हणतात. पण तो खरोखरच क्रूर नाहीं. स्वर्गाचं द्वार उघडून मानवाला अनिर्वचनीय अशा शांतीची उपलब्धि करून देणारी व्यक्ति क्रूर कशी असूं शकेल ? उगाच त्याचं आम्हीं भेसूर चित्र रंगवितों. हळूच चोरट्या पावलांनीं, गालांतल्या गालांत हंसत येणाऱ्या वसंतऋतूप्रमाणें तो येतो. आत्म्याच्या बहिर्द्वारांना त्याच्या त्या सुकोमल अंगुलीचा स्पर्श होतांच तीं बंद होतात. पण अंतःकपाटें सताड उघडलीं जातात. कित्येक वर्षं बंधनांत पडलेला जीव मुक्त होतो. जीवाच्या खऱ्या आनंदाचा दिवस हाच. अंधारांतून प्रकाशाकडे, सांतांतून अनंताकडे, तो द्रुतवेगानं धांव घेत असतो. जीवाचा खरा वसंतकाल हाच. धन्य धन्य आहे तुझी कवे ! मृत्यूचें तूं चितारलेलं हें चित्र सत्य आहे. मृत्यू हाच जिवाचा वसंतकाल, हीच गोष्ट सत्य. मृत्यु, मृत्यु—" छातिवर हातांत हात अडकवून खिडकीकडे ते उभे राहिले. शून्य दृष्टीनें ते पलीकडे पहात होते.

## एकनिष्ठ प्रेम

" आनंदराव, आनंदराव, " अर्ध्या उघड्या दारांतून आंत येत असलेल्या एका गृहस्थानें हांक मारली. आनंदरावांनीं 'ओ' दिली नाहीं, ते या जगांत असतील तर ना ! त्यांचें शरीर फक्त उभें होतें. मन दुसऱ्या कुठल्या तरी अंतराळांतल्या सृष्टींत भटकत होतें.

" दादा, दादा, रामरावकाका आले आहेत." त्या गृहस्थांच्या मागोमाग धांवत आलेल्या प्रभाकरानें आपल्या दादांच्या पायांना घट्ट मिठी मारली.

" दादा, दादा ! "

आनंदराव भानावर आले. " कोण, प्रभा ! " त्याला कुरवाळीत ते म्हणाले. त्यांचा कंठ, कां कोण जाणे, यावेळीं सद्गदीत झाला होता.

" रामरावकाका आले आहेत. "

" कोण, रामराव ! कुठं ? हो, हो, बसा. महादूनं दिवा लावला नाहीं वाटतं. जा, जा. त्याला सांग, म्हणावं दिवा झटकन् लाव. बसा रामराव. उभे कां ? बरेच दिवसांनीं इकडे फिरकलांत ! किती वेळ झाला येऊन इथं ?"

" हा आत्तांच आलों. पांच मिनिटं झालीं असतील नसतील. आपण कसल्यातरी विषयावर विचार करीत असलेले दिसलां, तेव्हां म्हटलं स्वस्थ उभं रहावं, व्यत्यय आणूं नये."

" व्यत्यय कसला ! आपला उगाच जरा खिडकीपाशीं उभा होतों झालं."

" उगाच ! उगाच आपण असे निश्चल उभे खास राहणार नाहीं."

आनंदराव फक्त हंसले. रामरावांच्याहि चेहऱ्यावर स्मित झळकलें.

महादूनें आंत येऊन दिवा लावला. अंधाराचें गांभीर्य नष्ट होऊन प्रकाशाचें चांचल्य सुरू झालें,

" उद्यां अप्पाचा वाढदिवस. आठवण आहे ना ? सारी मंडळी सकाळीं आठ वाजतां जमणार आहे. प्रभाला घेऊन यावं."

" खरंच. उद्यां तुमच्या अप्पाचा वाढदिवस नाहीं का ? मी विसरलों होतों. हो, हो. अवश्य येईन. विश्वनाथ, कालिंदी पुण्याहून आलीं का ?"

" कालिंदी आली आहे. विश्वनाथ परवां येणार आहे."

" कां बरं इतका उशीर ? कॉलेज तर दहा तारखेला बंद झालं. "

" त्याचं कांहीं तरी काम निघालं म्हणून राहिला आहे. "

" अस्सं. "

" बरं आहे. अण्णासाहेबांकडे वगैरे अजून जायचं आहे. येतों. उद्यां याचचं मात्र विसरतां कामा नये. प्रभा उद्यां येशील ना तूं दादांबरोबर आमच्याकडे ?"

" हो, हो. जायचं ना दादा ?"

" हो, हो. जायचं तर. तुझी ती जरीची टोपी, रेशमी कोट अन् विजार महादूला काढून ठेवायला सांग. "

" आत्तांच सांगूं ?"

" आत्तां नको. उद्यां सांगितलंस तरी चालेल."

" दादा, मघां तुम्हीं खिडकीपाशीं गप्प कां हो उभे होतां ? आईची आठवण झाली, होय ? "

आनंदरावांना या अनपेक्षित प्रश्नाला उत्तर काय द्यावें हेंच कळेना. पण कांहीं तरी उत्तर दिलंच पाहिजे म्हणून ते म्हणाले, " हूं. "

" बनुमावशी म्हणत होत्या, ती ती चांदणी दिसते ना, तिथं आई रहाते म्हणून. खरंच का हो आई तिथं राहते ?"

" हूं "

" मग आपण जाऊं या दादा तिथं एक दिवस. जायचं ना दादा ? "

ते मुग्ध बनले. आभाळांतील त्या तेजस्वी चांदणीकडे ते सारखे आशाळभुतासारखे टकटकां पहात होते. " खरोखरच माझी आनंदी तिथं असेल का ? आनंदी, आनंदी !" त्यांचे नेत्र अश्रूंनीं डबडबले. कंठ सद्गदित झाला. हृदयांत खळबळ सुरू झाली.

" दादा, दादा, बोलत कां नाहीं. रागावलां होय माझ्यावर." त्यांच्या गालांवर आपले चिमकुले हात ठेवीत आर्जवाच्या स्वरानें प्रभानें विचारलें.

आतां मात्र त्यांच्यानें राहवेना. त्याला त्यानीं जवळ ओढलें आणि त्याचे मटामट मुके घ्यावयाला सुरवात केली.

" माझ्या बाळावर मी कसा बरं रागावेन !"

तोहि गहिंवरला आणि त्यानें आपलें चिमणें डोकें आपल्या दादांच्या स्कंधावर ठेविलें. आभाळांत लक् लक् करणाऱ्या त्या तेजस्वी चांदणीचा

क्षीण असा एक किरण प्रभाच्या गालावर येऊन पडला. आपल्या गुणी बाळाच्या गोड पाप्याला बरेच दिवस मुकलेल्या आनंदीबाई या किरणाच्या रूपानें खालीं आल्या नसतील ना ! कुणाला ठाऊक !

[ ६ ]

प्रभा गाढ झोपीं गेला होता. आणि आनंदराव एका कुशीवरून दुसऱ्या कुशीवर सारखे वळत होते. विचार, विचार, विचार. विचारांची सारखी परंपरा लागली होती. संध्याकाळचे ते मृत्यूच्या स्वरूपाबद्दलचे विचार आणि मघांचें प्रभाचें तें चांदणींविषयींचें बोलणें, त्यांच्या कानांत सारखें घुमत होतें. जणूं काय प्रभा आतांहि त्यांच्या कानांत म्हणत होता, ' आपण जाऊं या दादा तिथं एक दिवस. जायचं ना ? जायचं ना दादा ?' " हा संसार हें एक विलक्षण कोडं आहे ! वास्तवीक जीवांची एकमेकावरील अनुरक्ति खोटी आहे. कोणी कुणाचं नव्हे हेंच खरं. अं, अं. छे; पण ही माया ! हे कुसुममालांचे नाजुक बंध जीवाला तोडवत नाहींत, त्यांच्यांतच गुरफटून रहावंसं वाटतं. तीं बंधनं न वाटतां भूषणं वाटतात. " त्यांचे आपल्याशींच विचार चालले होते.

चंद्र हळुहळु वर येऊं लागला. त्याचे शीतळ सुधामय किरण तरुलतांवर नाचूं बागडूं लागले. वसुंधरेनें श्रुतिमधुर असा ताल धरला. लहरी वायु स्वच्छंदपणें विहरूं लागला.

आनंदराव वर उठून बसले. कुणीतरी गात असल्याचा त्यांना भास झाला. त्यांनीं खिडकीचीं दारें उघडलीं. बाहेर वाहणारा वारा घस्सकन् आंत आला. 'हो कुणीतरी गातंच आहे' त्यानीं अवधानपूर्वक त्या दिशेकडे कान टवकारले. बराच वेळपर्यंत त्यांना स्पष्ट ऐकूं येईना. पण पुढें गाणारा ऐन रंगांत आल्यामुळें कीं काय कोण जाणें, गाणें स्पष्टपणें ऐकूं येऊं लागलें. कोल्हटकरांच्या मूकनायकांतील विक्रांताच्या तोंडचें तें गाणें होतें. गाणारा गाण्याशीं समरस झाल्यामुळें आळवून आळवून तें म्हणत होता.

**तुजविण गमे वृथा संसार ॥ संसारसौख्य कुठवें ॥ ध्वनि जिथें न तव चरणिंचे ॥ १ ॥ तुजविण जगीं कुठें आराम ॥ आराम-हीन सृष्टि ॥ तव जिथें न शीतल दृष्टि ॥ २ ॥ तुजविण कुठें नसे**

**आलोक ॥ आलोकशून्य जगती ॥ तव हास्य जिथें नच सुदति ॥३॥ तुजावण नको नको आनंद ॥ आनंद तरिच होई ॥ अनुभवा तुझ्यासह येई ॥ ४ ॥**

आनंदराव निमिलीत नयनांनीं तें ऐकण्यांत गुंग झाले. आणि लवकरच--

[ ७ ]

" मी आलें आहें बरं. "

" अं, अं. तूं ! तूं कुठून आलीस. छे ! तूंच का ती ? छे, छे. उगाच कांहींतरी ! स्वप्न आहे झालं ! हः हः हः ! स्वप्न. काय वेडा पहा मी ! अं, अं. " त्यांनीं डोळे चोळले.

" असं काय वेड्यासारखं करायचं. " ती गालांतल्या गालांत हंसत म्हणाली.

" आनंदी, तूंच का ती ? "

" तूंच का ती म्हणजे ! अजून थट्टेची खोड गेलीच नाहीं वाटतं. आज चालवलंय तरी काय ? "

" आज आज ! म्हणजे तूं खरोखरीचीच का आनंदी ? पाहूं तुझा हात. अरे बापरे, किती गार लागतो आहे हा ! अन् थंडीनं किती ही हुडहुडूं लागलीस. शाल घालूं का अंगावर ? घे, घेच ही. " त्यांनीं आपल्या अंगावरची शाल तिच्या अंगावर घातली. तिच्या चेहऱ्यावर समाधान झळकूं लागलें. ती एक एक पाऊल जवळ जवळ येऊं लागली. अगदीं पलंगाशेजारीं ती आली. पांच दहा मिनिटेंपर्यंत ती सुखशय्येवर पहुडलेल्या आपल्या बालकाकडे सारखी टकटक पहात होती. ' किती गोड माझं बाळ, ' हृदयांत नानाविध विकारांची खळबळ उडाल्यामुळें तिचें श्वसन द्रुतगतीनें चाललें होतें. कांहीं वेळानें तिनें आपले ओंठ त्याच्या गालाला हळूच लावले.

" हं, हं, तो जागा होईल. सकाळीं वाटेल तेवढा वेळ त्याला घेऊन बैस."

" सकाळीं ! सकाळ कुठं आहे ? झालं माझं काम, येत्थें आतां. "

" येत्थें ! म्हणजे ? कुठं चाललीस ? आनंदी ! आनंदी ! थांब. " ते अत्यंत काकुळतीनें म्हणाले. पण ती—? तिनं मागें वळून पाहिलें नाहीं. पिंजारलेल्या कापसाच्या पुंजाप्रमाणें विरल होत ती कुठल्या कुठेंच नाहींशी झाली.

" दादा, दादा ! " जागा झालेला प्रभा त्यांना हालवीत म्हणाला. "रामरावकाकांकडे जायचं ना ? "

" अं " त्यांनीं आपले डोळे चोळले व नीट एकवार चोहोंबाजूला पाहिलें.

सकाळ झाली होती. सूर्याचे तांबुस कोवळे किरण खिडक्यांच्या तावदानावर चमकूं लागले होते.

" मग हें स्वप्नच तर ! " त्यांनीं दीर्घ उसासा टाकला.

'क्व्यँ क्व्यँ क्व्यँ' पलीकडच्या निंबोणीच्या झाडावर बसलेला पक्षी फड्फड् असा आपल्या पंखांचा आवाज करीत मध्येंच ओरडला.

[ ८ ]

रात्रीच्या त्या स्वप्नाच्यायोगें आनंदरावांचें चित्त अत्यंत अस्वस्थ झालें होतें. अंगांतील उत्साह नाहींसा झाला होता. शरीर अगदीं गळून गेलें होतें. नाइलाज म्हणून त्यांनीं अंगांत कपडे घातले. बाहेर कुठंच जाऊं नये असें त्यांना वाटत होतें. परंतु रामरावांना वाईट वाटेल एवढ्याकरितां ते बाहेर पडत होते.

" प्रभा, झाली का तुझी तयारी !"

" हो, हा आलोंच दादा. "

" चल, चल. लवकरच चल. "

प्रभा आज सुंदर पोषाखांत नटला होता. त्याच्या त्या गोंडस शरीराला तो रेशमी पोशाख चांगला खुलून दिसत होता.

" दादा, मी कसा दिसतों ?" आपल्या पोशाखावरून ऐटींत हात फिरवीत त्यानें विचारलें.

" चांगला दिसतोस. "

" महादू म्हणत होता कीं, मी राजपुत्रासारखा दिसतों म्हणून. खरंच का हो मी राजपुत्रासारखा दिसतों ?" त्यांच्या कंबरेला विळखा घालीत त्यानें त्यांना लाडीकपणानें विचारलें.

आनंदरावांच्या उद्विग्न चेहऱ्यावर कौतुकमिश्रित हास्याची एक बारीकशी छटा चमकली. त्यांनीं त्याला वर उचलून घेतलें आणि त्याच्या कोमल

गालांचा गोड पापा घेत ते म्हणाले, " माझा बाळ राजपुत्र तर ! आतां कुठली तरी राजकन्या पाहिली पाहिजे. खरं कीं नाहीं ?"

" परवांच्या गोष्टींतल्या राजकन्येसारखी पाहिजे मला, दादा. "

" सिंह–वाघांशीं लढावं लागेल तेव्हां ?"

" तरवार घेईन अन् मारून टाकीन. "

" अस्सं एकंदरींत बरेच शूर आहांत म्हणायचे ! बरं चला. रामराव तिकडे वाट पहात असतील. " त्याला त्यांनीं खालीं उतरलें. " महादू, जातों रे आम्हीं बाहेर. "

महादू बाहेर आला. त्याचे छोटे धनीसाहेब थोरल्या धनीसाहेबांच्या बोटांत बोट अडकवून गुलगुल गोष्टी करीत चालले होते.

" वहिनीसाहेब पाह्यजे होत्या हें कौतुक पाह्यला. भगवाना ! कां रे कोप केलास या म्हापुरसावर ! ह्यापुढं तरी माझ्या धनीसाहेबांना सुखांत ठेव."

इमानी महादूचा ऊर दाटून आला. त्याच्या डोळयांत आंसवें उभीं राहिलीं.

* * * *

" यावं, यावं. तुमचीच वाट पहात आहोंत. " सर्वजण उठून आनंदरावांना सामोरे जात म्हणाले.

" काय रे प्रभा, झोंपला होतास वाटतं फार." प्रभाचा हलकेच गालगुच्चा घेत रामरावांनीं विचारलें.

" मी नाहीं. दादाच झोंपले होते फार वेळ. "

" अस्सं !" सर्वजण कौतुकानें हंसले.

" बरं, आंत जा. तिकडे असेल पहा अप्पा. अप्पा ! हा पहा तुझा प्रभा आलाय. जा, जा, आंत. " रामरावांनीं त्याला आंत नेलें व त्याला त्याच्या संवगड्याच्या स्वाधीन केलें.

" काय आनंदराव, हल्लीं आमच्या सोशल क्लबावर अगदींच बहिष्कार टाकलात ?"

" बहिष्कार कसला अण्णासाहेब; नाहीं येत झालं. घरांतून बाहेरच पडावं असं वाटत नाहीं. "

" कां बरं ? आम्हां लोकांचा कंटाळा आला वाटतं ?"

" छे, छे उगाच कांहीं तरी !"

" मग असे वानप्रस्थासारखे काय राहतां ?" अण्णासाहेबांच्या या सूचक प्रश्नाच्यायोगें मंडळींच्या चेहऱ्यांवर किंचित् हास्य झळकलें व पलिकडे लोडाला टेंकून पडलेल्या नारायणरावांना एकदम काय स्फूर्ती झाली कोणाला ठाऊक, ते ताडकन् वर उठून म्हणाले, " आनंदराव, हा वानप्रस्थाश्रम टाकून पुन्हां गृहस्थाश्रमी व्हा बुवा."

" खरंच आनंदराव, गृहस्थाश्रमी व्हा बुवा. हें असलं वैराग्य आतां पुरे झालं. " अण्णासाहेबांनीं दुजोरा दिला.

आनंदराव फक्त हंसले.

" मी काय म्हणतों तें कळतं आहे ना ? " अण्णासाहेबांनीं पुन्हां विचारलें.

" न कळायला काय झालें ? अहो, ते होय म्हणावं कीं नाहीं, याचा विचार करीत आहेत. " नारायणराव मिस्किलपणें म्हणाले.

" तें कांहीं नाहीं बोवा, येत्या वैशाखांत तुम्हांला आम्ही चतुर्भुज करून सोडणार ? काय रामराव, आहे तुमची आम्हांला मदत करावयाची तयारी ?" फराळाचीं ताटें घेऊन येत असलेल्या रामरावांना अण्णासाहेबांनीं डोळे मिचकावीत विचारलें.

" हो, हो. आमची मदत हवी असली तर आम्ही ती अगदीं सक्रिय करायला तयार आहोंत. " ' सक्रिय ' या शब्दावर विशेष जोर देत आनंदरावांकडे हेतुपुरस्पर पहात ते हंसत म्हणाले.

आनंदरावांच्या डोक्यांत थोडथोडा प्रकाश पडूं लागला. पण ते गप्पच बसले.

" असे गप्प नका बसूं बुवा, आनंदराव. "

" मग काय करूं ? "

" आम्ही काय म्हणतों त्याला होय कीं नाहीं तें उत्तर द्या. "

" कोणती गोष्ट होय म्हणूं ? "

" आम्हीं आपल्याकरितां जी एक वधू निश्चित केली आहे ती आपल्याला मान्य आहे असं म्हणा. " नारायणराव उतावीळपणानें म्हणाले.

" म्हणजे ? रामराव, आज तुम्हीं मला वाढदिवसाकरितां बोलावलंत कीं वधू निश्चित करण्याकरितां ? " आनंदरावांनीं विचारलें.

" दोन्हीकरितां. " रामरावांनीं खालच्या मानेनें उत्तर दिलें.

आनंदराव, या अनपेक्षित उत्तरानें थक्कच झाले. !

" हें पहा, आनंदराव तुम्हांला स्पष्टच सांगायचं, म्हणजे आमची व रामरावांची अशी फार इच्छा आहे कीं, तुम्हीं कालिंदीला स्वीकरावं. गेल्या दोन वर्षांपासून आपल्याशीं या बाबतींत बोलणं करावं असं प्रतिदिवशीं त्यांना वाटत होतं परंतु कसं बोलावं काय बोलावं याच विचारांत दिवस गेले. पहा, आम्हां सर्वांच्या आशेचा भंग करणं किंवा न करणं आपल्या हातांत आहे. कालिंदीच्या नशिबानं जर तिला तुमचं घर लाभलं तर तिचं अन् तुमचं दोघांचंहि जीवन आनंदमय होईल आणि रामराव व आम्हीं आपला तो आनंद पाहून सुखी होऊं. मग काय, होय म्हणतां ना ? "

आनंदराव कांहीं वेळ स्तब्धच राहिले. अशा या अनपेक्षित व चमत्कारिक प्रश्नास ते काय उत्तर देणार ?

" मग काय, बोला ना ? आमचा विरस करूं नका बुवा. " अण्णासाहेब अत्यंत आर्जवाच्या स्वरांत म्हणाले. सर्वजण उत्तर ऐकण्याकरितां उत्सुकतेनें आनंदरावांकडे पहात होते.

" तुम्हीं मला अशा कांहीं चमत्कारिक परिस्थितींत घातलं आहे कीं, मला तुमच्या प्रश्नाचं काय उत्तर द्यावं हेंच कळत नाहीं. "

" उत्तर काय द्यायचं. होय म्हणा म्हणजे झालं. आणि हें पहा, कालिंदी-चीहि इच्छा आहे. मग काय ? "

" असा माझ्यावर एकच गिल्ला करूं नका. मला विचार करायला अंमळ सवड द्या. "

" हरकत नाहीं. निराश मात्र करूं नका म्हणजे झालं. " अण्णासाहेब म्हणाले.

" पोरीच्या नशिबीं काय असेल तशी नारायण बुद्धि देईल." दाराच्या आड हें सारें ऐकत उभ्या असलेल्या सावित्रीकाकू-रामरावांची वृद्ध आई—सुस्कारा सोडीत म्हणाल्या.

आनंदरावांचा जीव हलला. " काकू, आपणा सर्वांचीच जर तशी इच्छा आहे तर मी त्याच्या बाहेर जाऊं इच्छित नाहीं, " असें त्यांना म्हणावेसें वाटलें. हे शब्द त्यांच्या ओंठावर आले सुद्धां; पण तितक्यांतल्या तितक्यांत त्यांनीं मनाला आंवरून धरलें.

[ ९ ]

आनंदरावांच्या मनाची स्थिति द्विधा झाली होती. एकदां त्यांना वाटे, आपण आपल्या स्नेह्यांचीं मनें मोडूं नयेत; एकदां वाटे ते नाराज होतील. होतील कांहीं दिवस नाराज. त्यांत काय मोठंसं. पण दुसऱ्याच क्षणीं हे विचार पालटत, " कालिंदीसारखी सहचारिणी लाभणं पुढील आयुष्याच्या दृष्टीनें हितावह नाहीं का ? ती सुसंस्कृत आहे. सुविचारी आहे, गृहिणीपदाला योग्य असे सद्गुण तिच्यामध्यें आहेत. मग अशा स्थितींत आनंदीची जागा मी तिला दिली तर त्यांत काय वावगं झालं. माझं, माझ्या प्रभाचं आणि तिचें जीवन पूर्वीसारखं आनंदमय नाहीं का होणार ? आनंदीच्या निर्वाणानंतर मालवलेला गृहदीप पुन्हा प्रज्वलीत होईल, माझें शांतिसदन, माझ्या जिवलगांचं शांतीचं, विश्रांतीचं स्थान होईल ! पण ज्या हृदयांत आनंदीनें एकदां प्रवेश केला त्या हृदयांत दुसऱ्या कुणाचा प्रवेश होणें शक्य आहे काय ? माझं सर्वस्व मी आनंदीला अर्पण केलं होतं—होतं कां—आहेहि ! छे ! दुसऱ्याचा त्या ठिकाणीं यापुढें प्रवेशच होणं शक्य नाहीं. तिचं स्थान जरी आज उघडं पडलं असलं, तरी तें पवित्र आहे. त्या ठिकाणीं दुसऱ्याची स्थापना कधींच होणें शक्य नाहीं. विवाह, विवाह ! कशासाठीं ? शारीरिक सौख्यासाठीं ? मानसिक सौख्यासाठीं ? आत्मिक सौख्यासाठीं ? हः हः हः काय मूर्ख मी ! ! माझ्या सारख्याला असल्या शब्दांनीं भुलवावं ! पस्तीशीच्या घरांत आलेल्या व विवाहसौख्य एकवार भोगलेल्या माझ्यासारख्या माणसानं विवाहाखेरीज शारीरिक, मानसिक, आत्मिक सौख्य मिळूं शकणार नाहीं असें मानावं, यासारखी हास्या-

स्पद गोष्ट ती आणखी कोणती ? या सर्व लोकांना एकदां स्वच्छ सांगून टाकायचं कीं, यापुढं असले प्रश्न मला विचारीत जाऊं नका. हो, हाच निश्चय ! हाच निश्चय ! !" हे शेवटचे शब्द त्यांनीं इतक्या मोठ्यानें उच्चारले कीं, पलीकडे पलंगावर झोंपीं गेलेला प्रभाकर एकदम दचकला आणि त्यानें 'दादा !' म्हणून किंचाळी मारली. आनंदराव भानावर आले. त्यांना आपली चुकी कळली. ते जवळ गेले. त्याला त्यांनीं आपल्या उराशीं घट्ट कंवटाळलें, त्याच्या कोंवळ्या गालांचा एक मुका घेतला व त्याला थोपटण्यास सुरुवात केली. प्रभा हळू हळू झोंपीं गेला. त्यांच्या डोक्यांतील मघांच्या त्या विचारांचें सारें काहूर कुठल्याकुठेंच पार नाहींसें झालें ! हृदय-स्पंदन जोरानें चालू होतें ! त्यांच्या नेत्रांतून अश्रू टिपकूं लागले होते.

कांहीं वेळानें त्यांनीं आपल्या नेत्रांतून वाहणारे अश्रु पुसले, प्रभाच्या हातांचा गळ्याभोंवतालचा विळखा हलकेच सोडवला आणि ते पलंगावरून उठून आपल्या नेहमींच्या आरामखुर्चीवर जाऊन पडले.

त्यांनीं आपली उदासवाणी नजर खिडकीकडे फेंकली. बाहेर अंधार पसरला होता. लिकलिकणाऱ्या तारकांचे क्षणि किरण त्यांतून आपला मार्ग काढीत होते. आणि त्या दिवशींची ती चांदणी आभाळांत त्याच ठिकाणीं चमकत होती.

आनंदराव भोंवतालची सारी सृष्टी विसरले. त्यांची नजर त्या चांदणीच्या प्रकाशाशीं खिळून गेली. त्यांना त्या दिवशींची ती रात्र आठवली, प्रभाचें बोलणें आठवलें, तें स्वप्न आठवलें; नुसतें आठवलेंच नाहीं, चलचित्रपटा-प्रमाणें त्यांच्या डोळयांपुढून तें पुनः सरकूं लागलें. आणि तें गाणें ? त्या गाण्याचे सूर त्यांच्या कानांत सारखे घुमत होते. कोणी गात नसतांहि त्या गाण्यांतील प्रत्येक शब्द त्यांचें हृदय आंदोलित करीत होता. हृदयांत त्या गाण्याच्या आवृत्त्यांवर आवृत्त्या होत होत्या.

**तुजविण गमे वृथा संसार ॥ संसारसौख्य कुठचें ॥ ध्वनि जिथें न तव चरणिंचे ॥ १ ॥ तुजविण जगीं कुठें आराम ॥ आरामहीन सृष्टि ॥ तव जिथें न शीतल दृष्टि ॥ २ ॥ तुजविण कुठें नसे आलोक ॥ आलोकशून्य जगतीं ॥ तव हास्य जिथें नच सुदति ॥३॥**

**तुजविण नको, नको आनंद । आनंद तरिच होई ॥ अनुभवा तुझ्यासह येई ॥ ४ ॥**

* * * *

त्यांना भोंवतालच्या सृष्टीच्या अस्तित्वाची पुन्हां जाणिव नाहींशी झाली. त्यांना आभाळांतल्या इतर तारका दिसेनाशा झाल्या. त्या एकाच चांदणीवर त्यांची दृष्टी खिळून गेली होती.

'हेंच का आपलं एकनिष्ठ प्रेम?' असें खिजविणाऱ्या नजरेनें आनंदीच आपल्याला विचारीत आहे असा त्यांना भास झाला.

त्यांच्या रक्तवाहिन्या जोरानें सळसळत होत्या. कानशिलांतून वाफारे निघत होते. दृष्टी एकसारखी चांदणीवर खिळून राहिली होती. आणि 'हेंच का आपलं एकनिष्ठ प्रेम' या वाक्याचे प्रतिध्वनी त्यांच्या हृदयांत सारखे घुमूं लागले होते.

# मालकी हक्क!



" टक् टक् टक् "
उत्तर आलें नाहीं.

" टक् टक् टक्. टक् टक् टक्. "

" कोण ? " आंतून त्रासिकपणें सवाल आला.

" मी भाऊ नाईक. "

" आल्यें हं. " ती धांवतच दरवाजाकडे आली.

" या. अगदीं वेळेवर आलांत. तुमची आठवण व्हायला आणि तुम्हीं दारांत पाउल टाकायला एकच गांठ पडली. पाहिलींत माझी टेलीपथी. थट्टा करतां नाहीं का माझी ? "

" खूप आहे टेलिपथी. कावळा बसायला अन् फांदी तुटायला—"

" बऱ्यं बऱ्यं. पुरे झाला खट्याळपणा. आंत या आधीं. दारांत नको हें प्रदर्शन ! बाकी माझं आयुष्यच झालं आहे फुकटं प्रदर्शन म्हणा !"

शेवटचें वाक्य अधोमुख होऊन तिनें उच्चारलें. मला तें ऐकून कसेंसेंच झालें. मी तिच्याकडे पाहिलें. तिच्या चेहऱ्यावरील, दार उघडतांनाचा उल्हास चटूदिशीं मावळून त्यावर खिन्नता पसरलेली दिसली.

मघांचा तो त्रासिक सवाल व आतांची खिन्नता पाहून वाटलेंच कीं, आज घरांत कांहीं तरी वादळ उठलेलें आहे.

" आज वातावरण कांहीं ठीक नाहीं दिसत ? " मी तिच्याकडे पहात सूचक अर्थानें म्हणालों. इतक्यांत तिच्या लिहिण्याच्या टेबलालगतच्या भिंती· वर पेन्सिलीनें लिहिलेलीं पुढील वाक्यें दिसलीं. ' स्वजनांचा कळप सोडून, बाह्य भुलावणीला भुलून, लांडग्याच्या मागून गेलेल्या कोंकरा, भोग आपल्या

कर्माचीं फळें !' मनःक्षोभ तीव्र झाला कीं, तन्निदर्शक वाक्यें भिंतीवर खरडण्याची श्यामाताईला खोडच होती.

भिंतीवरील तें वाक्य वाचून काय झालें असावें याबद्दल माझ्या डोक्यांत लख्ख प्रकाश पडला. परंतु, ओंठावर बळेंच स्मित आणून व त्या वाक्याकडे अंगुलीनिर्देश करून, मी तिला म्हणालों, " श्यामाताई, इसापावर ताण करण्याच्या हेतूनं आजकाल एखादी नवी श्यामनीति लिहिली जाते आहे वाटतं ? "

" पुरे झाला टारगटपणा. तुम्ही पुरुष म्हणजे बिनकाळजाचे प्राणी. माझं अंतःकरण कसं जळतं आहे ! माझ्या मस्तकावर कसे असंख्य घणाचे घाव बसताहेत ! आहे तुम्हांला त्याची कांहीं कल्पना ? बायकांचा जन्म म्हणजे कोण्या जन्मींच्या पापाची शिक्षा ! भाऊसाहेब, भाऊसाहेब, त्यानीं, मला कोणत्याहि प्रकारें सुखी होऊं द्यायचं नाहीं असा चंगच बांधलेला दिसतो. मागचे छळवाद क्षणभर विसरून गृहस्थाचं आदरातिथ्य केलं; वैषम्याची एवढीशी देखील भावना चेहऱ्यावर दिसूं दिली नाहीं. कांहीं झालं तरी मोरू त्यांचा मुलगा. त्यानां त्याला भेटावंसं वाटणं साहजिक आहे. आणि माझ्या त्यानीं केवढाहि अन्याय केलेला असला, तरी मोरूविषयीं त्यांना वाटत असलेल्या प्रेमांत आपण आडकाठी कशाला आणा ! पण या चांगुलपणाची त्यांना काय किंमत ! मी त्यांच्या गळ्यांत माळ घातली, त्यांची बायको झालें, बटीक झालें; ते माझे मालक झाले. आतां घर मोडलं. वेगळे झालों. पण हक्क–मालकी हक्क सुटत नाहीं. या मालकी हक्काच्याच जोरावर ते मला घालून पाडून बोलत होते. दुष्ट ! दुष्ट ! एक वेळ वाटलं कीं, ताडताड उत्तरं द्यावीं आणि स्पष्टच सांगावं कीं, यापुढं माझा उंबरठा ओलांडूं नका. पण मोरूकडे पाहून गप्प बसावं लागलं. आणि वाटेल ते किळसवाणे आरोप मुकाटपणानें ऐकून घ्यावे लागले. नको हें जिणं. भाऊसाहेब, भाऊसाहेब, या जगांतून, जिथं एकाहि मनुष्याचं तोंड कधीं दिसणार नाहीं अशा ठिकाणीं कुठं तरी दूर दूर जावंसं वाटतं. "

तिनें आपलें डोकें आपल्या दोन्हीं हातांनीं घट्ट आंवळलें. जणूं काय ती आपल्या डोक्यांतील वावटळीला दाबांतच ठेवीत होती.

" आज विनायकराव आले होते वाटतं ? " मी म्हणालों.

" होय. गेल्या पंधरवड्यांतील माझ्या उल्हसित वृत्तीचं चांगलंच उट्टं निघालं. "

" म्हणजे झालं तरी काय ? "

" व्हायचं काय ? नेहमींचाच दुष्टपणा. पण आजच्या दुष्टपणाला सीमाच नाहीं. नाटकांतलि खलपुरुषाचा दुष्टपणा त्यापुढं कांहींच नाहीं. अहो, आज रविवारचा दिवस, सबंध आठवडाभर काम करून दमलेल्या जीवाला थोडासा विरंगुळा म्हणून, कांहींतरी गाणं गुणगुणत या इथं ब्लाउझ शिवीत बसलें होतें. इतक्यांत ही स्वारी आली. हंसतमुखानं त्यांना मी, ' या, बसा ' म्हटलं आणि चहा करायला आंत गेलें. चहा घेऊन कांहीं वेळानं बाहेर आलें, तो स्वारी खोलींतील वस्तूंचं निरीक्षण करण्यांत दंग झाली होती. त्यावरून, मी सहजच म्हटलं, ' एवढं काय बारीक निरीक्षण चाललंय ? ' नेहमींप्रमाणें गंभीर चेहरा करून, ओंठ दाबीत पण मर्मभेदक आवाजांत म्हणतात, ' नव्या जमान्यांतील नवी सृष्टी पहावी म्हटलं.' ' तुमच्या नव्या जमान्यांतील सृष्टी इतकी ती प्रेक्षणयि नाहीं खास ! ' असं म्हणायचं माझ्या अगदीं ओंठावर आलं होतं, पण संयम केला. उगाच नको म्हटलं भडका उडायला. बाकी मर्जी सांभाळतां सांभळतां अखेर भडका उडालाच म्हणा ! समोर तिपाई ठेऊन चहा पुढं केला. पण पेल्याला त्यानीं स्पर्श केला नाहीं. ' अलिकडे तुमची प्रकृती बरी झालेली दिसते. चेहराहि टवटवीत दिसतो. कांहीं विशेष औषध घेतां वाटतं. नवजवानांत फिरणं; कवि, कादंबरीकार, संपादक, वक्ते अशांशीं हरघडी संबंध यायचा, तेव्हां मलुल चेहरा असून काय कामाचा ! योग्यच आहे तें. एवढंच, आपल्या मुलाच्या भावी आयुष्याकडे लक्ष द्या. अमकी तमकीचा मुलगा म्हणून खालीं मान घालण्याचा त्याजवर प्रसंग न येवो. तुम्हीं सूज्ञ आहांच. खरं म्हटलं तर मला बोलण्याचा कांहींच अधिकार नाहीं. असंस्कृत मनुष्य मी. पण राहवत नाहीं म्हणून बोलतों.' त्यांच्या या बोलण्याचा मला बोधच होईना. ' तुम्हीं काय बोलतां आहां हें ? औषध कसलं ? कशाकरितां ?' मी म्हणालें. ते दुष्टपणानें हंसले. मला म्हणतात, ' काय लपंडाव खेळतां आहां ! श्यामाबाई

मी अजून आंधळा नाहीं बनलों. बाकी त्याची तुह्मीं वाट पहातां आहां ह्मणा. दृष्टी हलु हलु मंद होतेच आहे.' मला ह्मणावंसं वाटलं कीं, 'आणखी निशाचरी करावी ह्मणजे लख्ख होतील डोळे !' कसले लपंडाव खेळतें आहे मी तुमच्याशीं ?' मी त्रासून ह्मणालें. 'तें काय?' शिवणकामाच्या सामानाजवळ पडलेल्या डबीकडे बोट दाखवून ते मिस्किलपणें हंसले. 'कसली डबी ? ही, ही, ! ही तर सुयांची डबी.' 'सुयांची डबी ! वर काय लिहिलं आहे ?' 'ओकासा.' 'ओकासा, ओकासा ! ठाऊक नाहीं तुह्मांला हें नांव? वर्तमानपत्रं, मासिकं वाचतां आणि हें नांव ठाऊक नाहीं ?' माझ्याकडे टंवकारून पहात ते पुन्हां फिदीफिदी हंसले. माझ्या डोक्यांत चक्क प्रकाश पडला. मी क्षणभर गोंधळलें. पण दुसऱ्याच क्षणीं बेभान झालें. कळली तुमची विचारसरणी. तारुण्य आणण्याकरितां मी ओकासाच्या वड्या घेतें, आणि नवऱ्यानं टाकलेल्या बायकोनं त्या घेणं हें तिच्या स्वैर वागणुकीचं निदर्शकच आहे, हेंच तुम्हांला दाखवावयाचं होतं. होय ना ? मग मी स्पष्टच सांगतें, मला त्याची आवश्यकता कधींच भासली नाहीं. काल आमच्या त्या पुरोहितांकडे गेलें असतां ही डबी दिसली. मला वाटलं सुया ठेवायला सुरेख डबी आहे, घेऊन जावी. आणि तिच्यांत या सुया ठेवल्या. तुम्ही दाखवीपर्यंत आपल्याकडे अशी डबी असल्यानं असा कांहीं आरोप ऐकण्याचा प्रसंग येईल असं वाटलं नव्हतं मला. तुमचं समाधान नाहीं व्हायचं या स्पष्टीकरणानं कदाचित.' 'समाधान नाहीं झालं तरी त्याची तुम्हांला काय पर्वा आहे ?' ते खोंचून म्हणाले. 'बरं जाऊं द्या. काय करायचंय मला त्याच्याशीं. मी जातों आतां. मोरूला जातों बरोबर घेऊन. दोन दिवस राहून येईल परत.' मी गप्प राह्यलें. मोरूला कपडे घातले आणि त्याला त्यांचे स्वाधीन केलं. चहाचा पेला तसाच तिपाईवर निवत पडला होता. 'चहा नाहींच का माझ्याकडचा घ्यायचा कधीं ?' मी म्हणालें. 'मी नाहीं घेतला म्हणून काय बिघडलं. तुमचा चहा घेणारीं कितीतरी माणसं आहेत. माझ्यासारख्या एखाद्यानं नाहीं घेतला तर नाहीं घेतला.' मोरूला त्यानीं वर उचलून घेतलं व ते निघून गेले. भाऊसाहेब, किती जहर विष ओकत होते हो, हे ! त्या विषानं माझं हृदय आरपार कोळपून टाकलं."

तिच्या डोळयांत आतां आंसवें जमा होऊं लागलीं. तिच्या तोंडून शब्द बाहेर पडेना. मीहि कांहीं वेळ गप्पच बसलों. आजचा हा प्रसंग तितकासा मला नवा नव्हता. अशातऱ्हेच्या अनेक प्रसंगांची हकिकत मी श्यामाताईच्या तोंडून अनेकवेळां ऐकली होती व अशाप्रसंगीं कसें वागावें याबद्दलचें बोलणेंहि पुष्कळ झालें होतें.

श्यामाताईचा आणि माझा स्नेह फार जुना. तिच्या पतिराजांचाहि तसाच. कॉलेजांत शिकत होतों त्यावेळेपासूनच्या आमच्या ओळखी. श्यामाताईची विनायकरावांशीं मींच पहिल्यानें ओळख करून दिली. आणि पुढें तर विनायकरावांनीं तिला आपल्याशीं लग्नच करायला भाग पाडलें. दोघांचा विवाह त्या काळांत फारच गाजला. मिश्रविवाह होता तो. श्यामाताई सारस्वत ब्राह्मण आणि विनायकराव पाठारे प्रभु. आज असल्या विवाहाचें कोणाला कांहीं विशेष वाटत नाहीं. पण दहा बारा वर्षांपूर्वी समाजांत तो खळबळ उडवून देणारा विषय होता. हा विवाह झाला त्याच्या दुसऱ्या दिवशीं त्यावेळच्या एका टवाळ दैनिकानें श्यामाताई व विनायकराव यांच्या-संबंधींच्या खऱ्या खोट्या खमंग मजकुरानेंच सबंध अंक भरून काढला होता.

श्यामाताईचा विनायकरावांशीं विवाह होणें ही आम्हां तिच्या इतर स्नेह्यांना कांहीं बाबतींत नवलाचीच गोष्ट होती. विनायकरावांपेक्षां बुद्धी, विद्वत्ता, सुसंस्कृतता या बाबतींत त्यांचेपेक्षां अनेक पटींनीं श्रेष्ठ असे अनेक तरुण श्यामाताईच्या स्नेहीमण्डळांत होते. आणि विवाह करावयाचा झालाच तर श्यामाताई त्यांपैकीच कुणाशीं तरी करील असें आम्हांस वाटे. पण श्यामाताईत जे एक दोन दोष होते, त्या दोषांचा फायदा विनायक-रावांनीं चतुराईनें करून घेऊन, त्यांस कायमचें काबीज केलें. श्यामाताई तिच्या वेळच्या मुलींहून निराळया वळणाची होती. लहानपणापासून उदारमत-वादी वडिलांच्या देखरेखीखालीं वाढल्यामुळें तिची मनाची घडण वेगळी बनली होती बुद्धिमत्तेच्या बाबतींत ती कधीं मुलांना हार गेली नाहीं. खेळ, रसिकता अभिरुची, वादविवाद या बाबतींतहि तसेंच. श्यामाताईमध्यें जर कोणता दोष असेल, तर मानसिक कमकुवतपणा व व्यक्तिपूजेचें फाजील वेड. या दोषांमुळेंच ती आपलें स्वतंत्र व्यक्तित्व कधीं टिकवूं शकली नाहीं. भावना उचंबळवून

सोडणारें माणूस कोणी जवळ असलें कीं, झालीच ती तत्सम ! एखादा आकर्षक नेत्राचा विनोदचतुर बोलूं लागला कीं, गेलीच ती त्याच्या भाषणौघा-बरोबर वाहून ! स्वतःच्या अस्तित्वाची जाणीवहि मग नष्ट व्हावयाची. विनायकरावांनीं हें पक्कें ओळखून, तिला लाघवानें आपल्या प्रेमपाशांत अडकवून टाकलें. गृहस्थाची विद्वत्ता बेताची, पण बाहेरचें अवडंबर विलक्षण. दुसऱ्यांवर छाप टाकण्याची कला तर कौतुक करण्यासारखी; आणि विनोद-चतुर तर ते होतेच. भोगप्रिय माणसांतील सर्व गुणदोष त्यांच्यांत होते. जग ही भोगभूमी असून, ज्या ज्या गोष्टीनें स्वतःला सुख होईल त्या त्या गोष्टी करायला कधींहि कचरायचें नाहीं अशी त्यांची वृत्ती होती. या वृत्तीची विवाहाआधीं श्यामाताईला फारशी ओळख नव्हती. जगांत पुढें यावयाला लागणारे धडाडी, चिकाटी, बेडर पण हिशेबी वृत्ति, आपल्याकामीं इतरांना हंसतां हंसतां लावून इच्छित साधून घेण्याची कला इत्यादि गुण त्यांच्यांत होते. या गुणांचें त्यांची स्नेहीमंडळी कौतुक करी.

श्यामाताईचीं विवाहानंतरचीं पहिलीं चार वर्षें अतीशय सुखांत गेलीं. दोघेंहि पैसे मिळवीत. विनायकराव मुलांच्या शाळेंत व श्यामाताई मुलींच्या शाळेंत काम करीत.

चार वर्षांनंतर मोरूचा जन्म झाला. श्यामाताईचें बाळंतपण फारच कष्टाचें झालें. डॉक्टरनें मोठ्या हिंमतीनें तिला मृत्यूच्या जबड्यांतून ओढून काढलें म्हटलें तरी चालेल. तिची प्रकृति ढांसळली, चेहऱ्यावरील प्रसन्नता कमी झाली; शरीराचा पूर्वीचा आकर्षक डौल जाऊन अनाकर्षक गबाळेपणा आला; वेषभूषा आणि केशप्रसाधन यांकडे दुर्लक्ष होऊं लागलें; गप्पा, गाणें, हिंडणें कमी झालें. कामाची दगदग व शारीरिक दुर्बलता यांमुळें स्वभावांत थोडासा चिरचिरीतपणा आला. शाळेंतील काम, मुलाची व स्वतःची शुश्रुषा यांतच तिचा सर्व वेळ जाऊं लागला. विनायकरावांना गृहजविन बेचव वाटूं लागलें. तशांत मुलाच्या आगमनामुळें जुन्या खर्चांत नव्याखर्चांची भर पडली, त्यामुळें ओढाताण होऊं लागली. नवराबायकोंत कुरबुर धुसफुस सुरू झाली. शिक्षकाचा धंदा सोडून वाढत्या प्रमाणांत द्रव्य देणाऱ्या धंद्यांत पडावें असें त्यांना वाटूं लागलें. त्यानीं सर्व धंद्यांचें निरीक्षण केलें आणि एक दिवस

मास्तरकीचा राजिनामा देऊन, ते एका चित्रपटकंपनींत शिरले. श्यामाताईला नवऱ्याचा हा बदललेला पेशा आवडला नाहीं. पण त्यांच्या भाग्याच्या आड कशाला या म्हणून ती गप्प राहिली. विनायकरावांनीं आपलें सर्व लक्ष नव्या व्यवसायांत घातलें; त्यांतील सर्व खुब्या हस्तगत केल्या. ते सामान्य कारकुनापासून वाढत वाढत डायरेक्टरच्या जागेपर्यंत पोंचले व एक दिवस कंपनीचे भागिदार बनले. त्यांच्या हातांत पैसा हवा तसा खेळूं लागला; त्याबरोबर त्यांचा नूरहि पालटला. पूर्वीचे स्नेही दुरावले. नवे रंगेल स्नेही भोंवतीं गोळा झाले. घरीं त्यांचें दर्शन आठ आठ दिवसांनीं सुद्धां घडणें कठीण होऊन बसलें. एक रात्रीं तर त्यांनीं कमालच केली. कंपनींतील एका नटीला घेऊन स्वारी घरीं आली. दोघेंहि चांगलीं झिंगलीं होतीं. त्यांनीं घरांत येऊन वाटेल तो वाह्यातपणा केला. आजुबाजूच्या लोकांना बिनतिकटी नाटक पाहायला मिळालें. श्यामाताईला हें सारें असह्य झालें. विनायकरावांची दुसरे दिवशीं तिनें चांगलीच कानउघाडणी केली. पण ते थोडेच बधतात. गृहस्थ खराखुरा आर्यपुत्र ! त्यानीं चक्क सांगितलें, "तुला चोंबडेपणा करण्याचं कारण नाहीं. तुला माझी वागणुक पसंत नसेल तर दुसरीकडे रहायला जा."

"ठीक आहे." श्यामाताईनें तितक्याच कठोरतेनें उत्तर दिलें.

दोघांचे जीवितप्रवाह बदलले; दोघांचीं कार्यक्षेत्रें वेगळीं झालीं; दोघांच्या भोंवतालचा समाजहि बदलला.

श्यामाताईनें, शहराबाहेर निवांत ठिकाणीं मुलासह निराळें बिऱ्हाड केलें. आंत पेट घेत असलेल्या दुःखाच्या ज्वाला विझवायला बाह्य शांतता थोडी तरी मदत करील असें तिला वाटलें. सहा महिनेपर्यंत शाळा व बिऱ्हाड यांखेरीज तिसरें ठिकाण तिला माहित नव्हतें. सोबत हवी ह्मणून एक अनाथ बाई आश्रयाला ठेविली होती; ती घरांतलें व बाहेरचें सर्व काम पाही. वडील, आई व इतर भावंडें मधून मधून समाचार घेऊन जात. मी व एक दोघे स्नेही एक दोन आठवड्यानें भेटत असूं. सुट्टी असली ह्मणजे आमच्या तासचे तास गप्पा चालत. या गप्पांचा तिच्यावर फार चांगला परिणाम झाला. सुतकी गांभिर्याचें कवच हळु हळु दूर करून, ती पूर्वस्थितींत येऊं लागली; वाचावें, लिहावें, वादविवाद करावे, आपल्याला आवड-

णाऱ्या चळवळींत पडावें असें तिला वाटूं लागलें. चेहऱ्यावरील खिन्नतेची कृष्ण छाया नाहींशी होऊन त्यावर उल्हासाचें कोवळें ऊन चमकूं लागलें.

श्यामाताईच्या बदललेल्या नव्या आयुष्यक्रमाबरोबर समाजांतील तिचा दर्जाहि बदलला. लोक तिला उत्तम लेखिका, वक्त्री व ध्येयवादी शिक्षकीण म्हणून चाहूं लागले. चंद्रकलेप्रमाणें तिची कीर्ति सारखी वाढत गेली. विनायकरावांना ही कीर्ति स्वतःच्या यशाला लागलेलें ग्रहणच आहे असें वाटलें. बायकोचा वरचढपणा—संबंध तुटला असतांहि—त्यांना असह्य झ.ला. त्यांचे कांहीं नवे स्नेही, त्यांना मुद्दाम खिजविण्याकरितां कुणा नव्या माणसाशीं ओळख करून देतांना अमकी तमकीचे हे पतिराज म्हणून ओळख करून देत, तेव्हां तर त्यांना इंगळया लागल्यासारखें होई. त्यांना बायकोबद्दल भयंकर मत्सर वाटूं लागला. आपण दूर असलों, विभक्त झालों असलों तरी तिच्यावरील आपला दाब साफ उडूं देतां कामा नये, असें त्यांना वाटूं लागलें. विभक्त झाल्यापासून वर्षभर श्यामाताईची आणि त्यांची दृष्टभेटसुद्धां झाली नव्हती. आतां ते मोरूला भेटण्याच्या मिषानें श्यामाताईकडे मधून मधून जाऊं लागले. 'तूं दूर पळाली असलीस तरी माझ्या नजरकैदेंतच नेहमीं राहशील,' याची जाणीव बायकोला सतत देऊन तिला धाकांत ठेवावयाचें हा या भेटीचा मुख्य हेतू असे. हा हेतू श्यामाताईला कळायला बरेच दिवस लागले. तिला पुन्हां वाटूं लागलें होतें कीं, नवऱ्याचा स्वभाव पालटेल व तो आपल्याकडे लवकरच परत येईल. त्याचें वारंवार होणारें हें आगमन पुनर्मीलनाचींच पूर्वचिन्हें आहेत असें तिला वाटूं लागलें. आशेच्या चांदण्यांत ती पुन्हां हिंडूं लागली.

स्वप्नसृष्टींतील चांदणें तें! एक दिवस पतिराजांनीं काळजाला झोंबेल असा चिमटा घेतला. डोळयांवरची झांपड उडाली. आणि तें चांदणें?—तें मोहजाल?—कुठल्याकुठेंच विरलें. ते—आपले पतिराज—पहारेकरी व आपण कैदी याची जाणीव, स्पष्ट, अगदीं स्पष्टपणें तिला झाली. पहारेकऱ्याच्या नजरेखालीं, पाय टेंकायला प्रेमाची हिरवळ नाहीं, डोकें शांत ठेवायला वर मायेचें छत्र नाहीं, अशा स्थितींत रखरखीत उन्हांतून आपल्याला प्रवास करायला

पाहिजे याची तिला खात्री झाली. अशा या तापदाय थतींत पहारेक त्याशीं मधुन मधुन झगडा उपस्थित होणें अपरिहार्य होतें.

मला ही सर्व स्थिति माहित असल्यामुळें, ओकासाच्या डबीवरून, विना यकरावांनो पत्नीवर पाखडलेल्या आगीचें विशेष आश्चर्य मला वाटलें नाहीं तशी पाखडली गेली नसती तरच आश्चर्य. बाकी, मनाला मात्र उद्विग्नत आली, नव्हे तें विटूनच गेलें. एकाद्या व्यक्तीचें व्यक्तित्व गाडून टाकून तिल बाहुलें बनविणारी सध्यांची विवाहसंस्था आधीं कां गाडली जाऊं नये, हा प्रश्न माझ्या डोक्यांत सारखा घोळूं लागला. मी डोळे मिटून स्वस्थ पडलों डोकें भ्रमत होतें. तशा स्थितींत मी किती वेळ पडलों तें माझें मलाच कळलें नाहीं. श्यामाताईनें हांक मारली तेव्हां कुठें भानावर आलों.

"एवढे कसल्या विचारांत मग्न झालां आहांत ?" ताई म्हणाली.

"या परिस्थितींत बदल तरी कधीं होणार याचा विचार करतों आहें."

"मालकी हक्काची भावना नष्ट होईल तेव्हां. बायको ही स्वतःच्य मालकीची मालमत्ता ही विचारसरणी विलयाला जाईल तेव्हां ! तोंपर्यं ह्या अशाच ठिणग्या उडत राहणार."

"पण जो हक्क आपल्याला पटत नाहीं तो उडवून कां लावूं नये ?"

"समाजाचा दाब चिरडून टाकील; तो मला किंवा कुणालाहि जिवं ठेवणार नाहीं."

"हूं. समाजाचा दाब ! मालकी हक्क ! मालकी हक्क !"

माझ्या डोक्यांत पुन्हां विचारांचें चक्र सुरू झालें.